श्री

# पंचोपाख्यान.

## श्लोक

पंचोपाख्यानश्रवणं पाठं संस्कृतोक्तिषु
बालानांसर्वत्रवैचित्र्यं नीतिविद्यांददातिच १

---

मनुवाचस्पति शुक्र पराशर व्यास चाणाक्य नृप शास्त्रकर्त्यांस साष्टांगनमस्कार करून, पंचोपाख्यानांतील कांहीं कथा घेऊन, लहान कथारूपग्रंथ, मंदमति लोकांसाठीं लिहितो; आणि ग्रंथाच्या श्लोकांचा अर्थही लिहितो; अशी कवि प्रतिज्ञाकरून कथा प्रारंभ करितो.

---

# प्रस्तावना.

पूर्वी पैठण नामक नगरांत सकल गुण- युक्त सुदर्शननामा राजा राज्य करीत होता. तो आपले पुत्र शास्त्र नजाणते मूर्ख असें जाणून बहुत चिंता करीत असे कीं, जे पुत्र विद्यावंत व धार्मिक नाहींत ते पुष्कळ असून फळ का- य ? जसें ज्या ह्मसी दूध देत नाहींत त्या पाळून कांहीं फळ नाहीं; यास्तव एकच पुत्र वेदशास्त्र जाणता असेल तर त्यापासून सर्व कुटुंब सु- ख पावेल; असा पुत्र नाहीं तर गर्भपात, अथ- वा जन्मतांच मृत, किंवा कन्या, अथवा भार्या वंध्याच असावी हें बरें; परंतु कुळांत अयोग्य पुत्र नसावा. पूर्व जन्मार्जित पुण्येंकरून उ- भयलोकीं सुखकारक असा पुत्र प्राप्त होतो; पापेंकरून कुळनाशक होतो; तर आतां कुमा- र्गवर्ती माझे पुत्र यांचा नीतिशास्त्राचे उपदेशें

करून कोण पुनर्जन्म करील? ही मनांतील गोष्ट एकेदिवशीं राजा सभेंत बोलला; तें ऐकून सकल नीतिशास्त्रीं प्रवीण बृहस्पतितुल्य असा विष्णुशर्मा नामक ब्राह्मण प्रतिज्ञा करिता झाला कीं, राजा! तुझे पुत्र सहा महिन्यांत नीतिशास्त्र जाणते मी करीन. असें ब्राह्मणाचें वाक्य ऐकून राजा संतुष्ट होऊन त्याचा सन्मान करून पुत्र स्वाधीन करिता झाला. मग तो ब्राह्मण पांच तंत्रें कल्पून कथारूप नीतिशास्त्र राजपुत्रांस सांगता झाला.

तीं पांच तंत्रें; प्रथम सुहृल्लाभ, दुसरें मित्रभेद, तिसरें संधिविग्रह, चवथें लब्धहानि आणि पांचवें संप्रेक्षकारित्व.



# तंत्र प्रथम.

## सुत्दल्लाभ.

### श्लोक

असाधनाावित्तहीना बुद्धिमंतःसुत्दत्तमाः
साधयंत्याशुकार्य्याणि काककूर्ममृगाखषः १

---

बुद्धिमंत जे मित्र, ते द्रव्य नसतां, व साहित्यही नसतां, परस्पर अत्यंत उपयोगी पडतात. जसें काक, मुषक, कूर्म, मृग, यांणीं अन्योन्यांचें रक्षण केलें. असें विष्णुशर्म्याचें भाषण ऐकून राजपुत्र पुसतात हें कसें? मग तो सांगतो.

गोदावरी तिराचेठायीं मोठ्या शेंवरीच्या वृक्षावर लघुपतन नामा कावळा रहात होता. कोणे एके दिवशीं प्रातःकाळीं तेथें यमासा-

रिखा अत्यंत भयंकर व्याध आला. त्यास पाहून लघुपतन चित्तांत भय पावून विचार करितो, हा दुरात्मा काय करील हें नकळे. यास्तव आहार मिळवावयाचा यत्न ठेऊन याचाच शोध करावा. इतक्यांत तो पारधी जाळें पसरून नानाप्रकारचीं धान्यें विखरून आपण तेथेंच लपून राहिला. त्यानंतर चित्रग्रीव नामा कपोतराज सपरिवार त्या वृक्षावर आला, आणि तेथें धान्य पाहून आपल्या समुदायास ह्मणतो, या वनांत धान्य कोणी आणिलें याचा ठिकाण लागल्याशिवाय हें भक्षूं नका; भक्षिल्यास जसा ब्राह्मण, कंकण लोभास्तव व्याघ्रापासून मरण पावला तसा अनर्थ घडेल. तें ऐकून कपोत विचारितात हें कसें? मग चित्रग्रीव सांगतो.

एक वृद्ध व्याघ्र भक्षण मिळवावयास अशक्त झाला ह्मणून तळ्याच्या तीरीं स्नान करू

न ह्मानांत दर्भ घेऊन बसला. इतक्यांत त्या मार्गानें एक ब्राह्मण चालला, त्यास व्याघ्र ह्मणतो, हे विप्रा! हें सुवर्ण कंकण घे. तें ऐकून तो त्याजकडे पाहून चित्तांत विचार करितो हें अनायासें प्राप्त होतें; तथापि व्याघ्राजवळ जाऊ नये, कां तो मृत्यूचें स्थान होय; ह्मणून येथें लोभ करूं नये. असें ह्मणावें तर मृत्यु सर्वत्र आहे; यास्तव प्रयत्न करावा, असा निश्चय करून बोलतो, कंकण कोठें आहे? तेव्हां व्याघ्रानें हातीं घेऊन दाखविलें. मग द्विज ह्मणतो, तुझा विश्वास काय? तो सांगतो मी प्रातःस्नान करून नित्य दान करीत असतों; नखदंतहीन वृद्ध झालों; अद्यापि माझा विश्वास नाहीं कीं काय? यज्ञ, अध्ययन, दान, तप, सत्य, धृति, क्षमा, अलोभ, असा आठ प्रकारचा धर्म मी जाणतों; ह्मणून ही अपूर्व वस्तु कोणासही द्यावयास इच्छितों; यावरून माझी सुबुद्धि किंवा

कुबुद्धि हें जाणत नाहींस कीं काय? तेव्हां ब्राह्मण बोलतो, हें सत्य; परंतु व्याघ्र मनुष्यांस भक्षितो, हा लोकापवाद फार आहे, व्याघ्र ह्मणतो, मी धर्मशास्त्रही जाणतों, प्राण जसे आपल्यास प्रिय तसेच सर्वांस; असें जाणून साधु जीवांवर दया करितात; सुख, दुःख, आपल्यावरून इतरांचें जाणतात, तूं फार दरिद्री यास्तव तुला द्यावयास मी यत्न करितों. शास्त्रही असेंच आहे कीं दुर्बळासच द्यावें धनवंतास देऊंनये, कां रोग्यास औषध जसें सुखकारक, तसें अरोग्यास होईल कीं काय? ह्मणोन मी सांगतों; तूं या सरोवरीं स्नान करून हें कंकण घे, मग घरास जा. नंतर ब्राह्मण व्याघ्र वाक्याचा विश्वास मानून स्नानार्थ तळयांत उतरतांच गाळांत रुतला त्यास निघतां येईना असें पाहून व्याघ्र बोलतो, भिऊं नको, तुला मी या चिखलांतून काढितों; याप्रमाणें भाष-

ण करून हळूच जाऊन त्यास धरिलें, तेसमयीं ब्राह्मण विचार करितो. दुष्टाचें वेदाध्ययन आणि धर्मशास्त्र, ऐकून त्याच्या वचनाचा विश्वास मानूंनये, कां, ज्याचा जो स्वभाव तो कदापि जात नाहीं. असें असतां मी या दुष्टाचा विश्वास मानून संकटांत पडलों. असा पश्चात्ताप करीत असतां तो व्याघ्रानें मारून भक्षिला. असें चित्रग्रीवाचें वाक्य ऐकून एक कपोत गर्वानें बोलतो, असा विचार केला तर भक्षणही मिळणार नाहीं. आणखी ऐक, ईर्षी, लज्जायमान, असंतुष्ट, क्रोधी, नित्यशंकित, परभाग्योपजीवी, हे सहाजण दुःख भोगितात. हें ऐकून सर्व कपोत धान्यभक्षणार्थ जाऊन जाळ्यांत सांपडले. तें पाहून कपोतराज ह्मणतो, सर्व न ऐकतां गेले आतां एकटें राहून फळ नाहीं. असें बोलून तोही त्यांत गेला. नंतर व्याध पक्षी गुंतले असें पाहून

त्यांजवळ येऊं लागला. त्यास पाहून कपो
चित्रग्रीवास ह्मणतात; आह्मी नीचाची बुद्धि ऐ
कून तुझा अवमान केला, त्याचें फळ प्रा
झालें. तेव्हां तो ह्मणतो, आतां हें बोलून फ
ळ काय? यास उपाय एकच आहे, सर्वांनीं ए
कदांच उडोन जाळयासुद्धां स्थलांतरास जावें
तरच प्राणरक्षण होईल. असें ऐकतांच सर्व
जाळयासुद्धां अकस्मात् उड्डाण करून गेले. ते
दुरून पाहून पारधी आश्चर्य मानून ह्मणतो,
एकचित्त होऊन जाळें घेऊन गेले, आतां जेव्हां
हे भांडूं लागतील तेव्हां माझे हातीं सांपडतील
असें मनांत आणून त्यांच्या पाठीमागें धांवूं
लागला. ते दिसत नाहीं असे झाल्यावर श्र
मी होऊन तो माघारा फिरला. हें संपूर्ण कौ
तुक पाहून लघुपतन कावळाही त्यांच्या मागें
गेला. नंतर कपोतराज आपल्या समुदायास
सांगतो, गंडकी नदीचे तिरीं चित्रवनांत माझा

मित्र हिरण्यक नामा मूषकराज राहतो तो दां-
तानीं आमचे पाश तोडील; तेथें जाऊं चला.
असें ऐकून ते तसेच तेथून उडोन मूषकराजा-
चे बिळासमीप जाऊन उतरले. हिरण्यक
भयास्तव विवरास शंभर द्वारें करून आंत
होता. त्याणे कपोतपतनाचा शब्द ऐकून भय
मानिलें; इतक्यांत चित्रग्रीव बोलतो, सख्या
हिरण्यका, कां आह्मांशीं भाषण करीत नाहींस!
असा आपले मित्राचा शब्द ओळखून, हर्षि-
तहोत्साता लौकर द्वारांत येऊन हिरण्यक ह्म-
णतो, मी पुण्यवान् यास्तव चित्रग्रीव मित्र मा-
झ्या घरीं आला. नंतर त्याची अशी अवस्था
पाहून, अत्यंत दुःखित होऊन बोलतो, मित्रा!
तूं सर्वांहून चतुर असतां तुला ही दशा कशी
प्राप्त झाली? तेसमयीं तो ह्मणतो, ज्याकाळीं
जसें होणार तसें होतें, ह्मणून दैव बलवत्, ये-
थें कोणाचा उपाय नाहीं. हिरण्यक बोलतो

गोष्ट खरी, तूं शंभर कोशांवरून वस्तूचा वि· चार करून जात होतास, तो आज लुब्धकाचे पाश न पाहतां बंधन पावलास. पहा चंद्र सू· र्यांस ग्रहांची पीडा; हस्ती, पक्षी, सर्प, यांस बंधन; बुद्धिमंतास दरिद्र; हाही दैवाचाच महि· मा. असें भाषण करून तो चित्रग्रीवाचे पाश छेदूं लागला; तेव्हां चित्रग्रीव ह्मणतो, मित्रा, अगोदर माझ्या समुदायाचें बंधन तोड, मग माझें छेद. तें ऐकून मूषक बोलतो; माझे दंत कोमल, शक्तिही अल्प, यास्तव इतक्यांचे पाश मला कसे तुटतील? ह्मणून तुझे तोडून मग आपल्या सामर्थ्याप्रमाणें यांचेही तोडीन. चि· त्रग्रीव बोलला; बरें तर यांचेच छेद. तेव्हां हिरण्यक सांगतो, आपलें रक्षण करून मग परिवार रक्षावा. कां, धर्म, अर्थ, काम, मोक्ष यांस साधक प्राण; ह्मणोन त्याचे रक्षणानें सर्वांचें रक्षण घडतें. चित्रग्रीव ह्मणतो, अशी

नीति खरी; परंतु हे वेतनावांचून मला राजा मानितात, ह्मणून माझ्या जिवाची इच्छा सोडून यांस वांचीव. या प्रकारचें त्याचें बोलणें श्रवण करून मूषकराज ह्मणतो. तूं परम साधु आश्रितांस सुखदायक आहेस. ज्या सेवकांची स्वामीवर भक्ति, व जो स्वामी सेवकांस सुख देणारा, ते उभयतां सौख्य पावतात. असें बोलून त्याणें सर्वांचे पाश तोडून नंतर चित्रग्रीवाचें बंधन छेदिलें. मग एकमेकास आलिंगून, प्रियगोष्टी सांगून, चित्रग्रीव सपरिवार आपल्या स्थलास गेला. लघुपतन कावळा हा सर्व वृत्तांत पाहून आश्चर्ययुक्त होत्साता हिरण्यकास ह्मणतो, तूं धन्य आहेस यास्तव मीही तुझी मैत्री इच्छितों, तर तूं कृपाकरून माझा मित्र व्हावें. तेसमयीं हिरण्यक बोलला, तूं कोण आहेस? तो ह्मणतो मी लघुपतन नामा कावळा; तें ऐकून मूषकराज

बोलतो, तर तुझें माझें सख्य कसें घडेल? लोकांत समानाशींच मित्रता असते. मी तुझें भक्ष, तूं माझा भक्षक, असें असतां हें कसें होईल? तुझी प्रीति माझे विपत्तीचें कारण. जसा मृग जंबुकाच्या सख्यानें बंधन पावला, तसें तुझ्या योगें मला घडेल. तें ऐकून लघुपतन पुसतो, हरणास बंधन कसें प्राप्त झालें? तेव्हां हिरण्यक सांगतो.

मगधदेशीं चंपक वनांत हरण आणि कावळा, हे दोघे मित्र होते. मृग यथेच्छ तृणादिक खाऊन अत्यंतपुष्ट झाला होता, त्यास एके दिवशीं जंबुकानें पाहिला; तेव्हां तो मनांत विचार करितो, हा मला असाध्य आहे यास्तव कपट करून यास मारावें. अशा निश्चयानें त्याच्या समीप जाऊन ह्मणतो, मित्रा, कुशल आहेस कीं? तें ऐकून हरण पुसतो तूं कोण? मग तो बोलतो, मी क्षुद्रबुद्धि नामा

कोल्हा, या अरण्यांत बंधुहीन दीनाचे परि ए-
कटा फिरत असतों; आज तुला पाहून फार
सुख झालें; आतां तुझी सेवा करून तुजपासीं
रहावयास, इच्छितों. असें त्याचें भाषण श्र-
वण करून मृगानें बरें ह्मटलें. नंतर सूर्यास्त
होतांच दोघे चंपक वृक्षाखालीं आले. त्या वृ-
क्षावर सुबुद्धि नामा कावळा त्या मृगाचा मित्र
रहात होता तो यांस पाहून मृगास पुसतो, हे
सख्या! तुझ्या शेजारीं दुसरा कोण आला?
हरण सांगतो, हा जंबुक मजसीं मित्रत्व करून
राहीन ह्मणतो, तेव्हां काक बोलतो मित्रा, अ-
कस्मात् अपरिचित आला त्याचा विश्वास
मानूं नये; ज्याचें कुळशील ठाऊक नाहीं त्या-
स स्थळ देऊं नये; जर दिलें तर मार्जारास
आश्रय देऊन जसा जरद्गवा गृध्र मरण पावला
तसें होईल. असें ऐकून मृग पुसतो, जरद्गवा
कसा मेला? मग कावळा सांगतो.

भागीरथी तिरीं त्रिकुट पर्वतावर एका वृक्षाचे ढोलींत जरद्गवागृध्र नखनेत्ररहित रहात होता. त्याच्या संरक्षणार्थ दुसरे पक्षी आपल्या आहारांतून थोडें थोडें देत होते; तेणें करून तो उपजीविका करीत असे. एके दिवसीं दीर्घकर्ण नामा एक मार्जार, पक्षांचीं पिलीं भक्षावयास त्या वृक्षाखालीं आला, त्यास पाहून पिलांनीं भिऊन मोठा शब्द केला. तो ऐकून गृध्र त्यांस पुसतो, तुह्मी कां भितां? येथें कोण येतो? इतक्यांत मार्जारानें जरद्गव्यास पाहून मी मरतों असें भय मानिलें. नंतर चित्तांत धैर्य करून ह्मणतो, या शत्रूपासून मला पळावयाची शक्ति नाहीं, यास्तव याच्या समीप जावें, मग जें व्हावयाचें असेल तें होऊं. असा निश्चय करून, त्याच्या जवळ जाऊन बोलतो, समर्था तुला वंदन करितों, तें ऐकून गृध्र पुसतो तूं कोण? तेव्हां तो ह्मणतो मी दीर्घ-

कर्ण नामा मार्जार आहे. मग जरद्गवा बो-
लतो, तूं लौकर येथून जा, नाहीं तर मरसील.
तेसमयीं मार्जार ह्मणतो मी आपला वृत्तांत
सांगतों तो ऐक, नंतर मारावयाचें असल्यास
मार; कांकीं भिन्न जातीच्यांस मारावें आणि
आपले जातीच्यांस न मारावें असें केवळ
नाहीं. त्यासाठीं त्याचा व्यवहार पाहून जें
करणें तें करावें. असें ऐकून गृध्र त्यास पु-
सतो तर तूं कां आलास? तो सांगतो, मी गं-
गातीरीं नित्य स्नान करून चांद्रायणादिक व्रतें
आचरित असतों; तूं फार धार्मिक आहेस असें
पक्षी मला सर्वकाळ सांगतात, ह्मणून मी तु-
झ्या दर्शनास आलों, कां विद्या वयोवृद्धापा-
सून धर्म श्रवण करावा असें शास्त्र आहे. तूं
तर धर्माचा त्याग करून मला मारावयास सि-
द्ध झालास, असा गृहस्थांचा आचार कोठें
पाहिला नाहीं; शत्रूही घरास आला तर, साधु

त्याचा सन्मान करिबात. वृक्ष जसा छेदन करण्यासही छायाच करितो, तसा साधूंच्या घरीं जो येईल त्याचा ते सत्कार करितात, त्यांत कांहीं न्यून पडूं देत नाहींत; कारण जो अतिथी ज्याचे घरांतून विन्मुख जातो तो आपलें पाप त्यास देऊन त्याचें पुण्य घेऊन जातो; यास्तव साधु सर्वांवर दया करितात; चंद्र, चांडाळगृहींही प्रकाश पाडितो. असें त्याचें भाषण ऐकून गृध्र ह्मणतो, मार्जार मांसभक्षक व हिंसक आहेत, ह्मणून मी बोलतों. तें ऐकून दीर्घकर्ण भूमीची शपथ घेऊन शिव शिव उच्चारून कानावर हात ठेवून बोलला, मी धर्मशास्त्र श्रवण करून परम वैराग्य पावून दुष्कर्माचा त्याग केला; कां, अनेक शास्त्रांचे ठायीं हिंसेप्रमाणें पातक नाहीं. असें सांगितलें याचें कारण, जे दुसऱ्याचा प्राण घेऊन आपल्यास सुख इच्छितात ते नरकास जातात; ह्म-

णून अहिंसेप्रमाणें दुसरा धर्म नाहीं. असें समजून जे वनांत राहून, फळ मूळ भक्षितात ते पातक कसें करतील? असें बोलून, गृध्रास विश्वास दाखवून, तो मार्जार त्याचे घरीं राहिला; आणि पक्ष्यांचीं पिलीं प्रत्यहीं तेथें आणून भक्षूं लागला. तेव्हां ज्यांचीं पिलीं भक्षिलीं, ते श्रमी एकत्र होऊन पिलांचा शोध करूं लागले; तें जाणून मार्जार तेथून पळाला. मग ते पक्षी पहात पहात, गृध्राच्या कोठऱ्यांत आले; तों पिलांच्या अस्थि व पक्ष, पडले होते ते पाहून सर्वांनीं निश्चय केला कीं आमचीं पिलीं याणेच भक्षिलीं. नंतर त्यांणीं गृध्रास मारिला. अशी कावळयाने कथा हरणास सांगितली ती ऐकून कावळयास जंबुक ह्मणतो तुझा स्वभाव यास पूर्वीं कळला होता कीं काय? यास्तव सज्जनांस स्वभाव कळायाचें प्रयोजनच नाहीं, त्यांची मैत्री दर्शनानेच होते.

तें ऐकून मृग कावळ्यास ह्मणतो, जसा तूं माझा मित्र तसा हाही असो. याप्रमाणें बोलून त्याणे जंबुकास आपल्या जवळ ठेविला. मग तिघेही दिवसास कोठेतरीं पोटभरून रात्रीस तेथें येऊंलागले. एके दिवसीं कोल्हा हरणास बोलतो, सख्या, या वनांत सुंदर एक शेत आहे तें तुला दाखवितों; असें बोलून त्यास नेऊन दाखविलें. नंतर तो जाऊन नित्य तें भक्षूं लागला. तें शेतकऱ्यानें पाहून तेथें पाश मांडिले. मग हरण तेथें जातांच पाशांत गुंतून पडला, तेव्हां चित्तांत ह्मणतो, आतां मला मित्रावांचून कोण सोडवील? इतक्यांत कोल्हा तेथें येऊन माझे मनोरथ सिद्ध झाले, आतां मी याचें अस्थि मांस पुष्कळ भक्षीन, असें मनांत आणून उभा राहिला. त्यास पाहून मृग बोलतो, मित्रा, माझे पाश लौकर तोडून मला सोडीव, कां संकटकाळीं

कामास येतो त्यासच मित्र ह्मणावें. तेव्हां जंबुक ह्मणतो, आज माझा वर्ज दिवस आहे, यास्तव मी ह्या चर्मबंधनास स्पर्श करीत नाहीं, उद्यां जें सांगसील तें ऐकेन. असें बोलून त्याची दृष्टि चुकवून तेथेंच लपून राहिला. नंतर रात्रीस मृग आला नाहीं ह्मणोन त्याच्या शोधार्थ कावळा इकडे तिकडे फिरत तेथें आला; तों हरणाची अशी अवस्था पाहून त्यास पुसतो, सख्या! तुझी दशा असी कां झाली? तेव्हां तो ह्मणतो तुझें वचन ऐकिलें नाहीं त्याचें फळ हें. कावळा ह्मणतो, जंबुक कोठें गेला? तो ह्मणतो माझें मांस खाण्याकरितां येथेंच लपून राहिला असेल. तें ऐकून काक बोलतो, हितकारी मित्राचें वचन जो ऐकत नाहीं त्यास विपत्ति लवकर प्राप्त होते; आणि तो शत्रूस आनंद करितो. असें बोलत असतां काष्ठदंड हातीं घेऊन शेतकरी आला, त्यास पाहून

कावळा मृगास सांगतो, सख्या! तूं आतां वा॰
यु स्तब्ध करून मेल्याचें सोंग घे, ह्मणजे तो
तुला पाहून तूं मेलास असें मानील. नंतर तो
तुझे पाश सोडून गुंडाळूं लागेल तेव्हां मी शब्द
करीन, तो ऐकतांच लवकर पळून जा, असें
त्यास सांगून आपण लटकाच त्याचा डोळा
टोंचूं लागला. इतक्यांत शेतकऱ्यानें मृगास
पाहून हा मेला असें समजून त्याचे पाश सो-
डून एकत्र करूं लागला; तें पाहून काकानें
संकेताप्रमाणें शब्द केला, तो श्रवण करतांच
हरण पळाला. त्यास मारावा या बुद्धीनें शेतक-
ऱ्यानें काठी झोंकिली ती अकस्मात् जंबुकास
लागून तो मरण पावला. असें सांगून मूषक
ह्मणतो, पुण्य अथवा पाप, फार झाल्यास त्या॰
चें फळ लौकरच प्राप्त होतें. यास्तव तुझें स॰
ख्य उपयोगी नव्हे. तेव्हां वायस बोलतो तुला
भक्षिल्यानें माझी तृप्ति होणार नाहीं, तूं जीवंत

असल्यास मी चित्रग्रीवासारिखें सुख पावेन, ह्मणून तुझी मैत्री इच्छितों. पुनः हिरण्यक बोलतो तूं माझा शत्रु यास्तव तुझी मैत्री मी करीत नाहीं. शास्त्रही असेंच आहे, रिपु जरी आपल्यास अनुकूळ आहे तरी त्याशीं मित्रता करूं नये. उष्ण झालेलें पाणी अग्नीचा नाश करितें, यास्तव जें योग्य तें करावें. उदकांत गाडा, व भूमीवर नौका चालेल कीं काय ? यासाठीं शत्रूचा आणि व्यभिचारिणीचा, विश्वास मानूं नये. असें मूषकानें कावळ्यास अनेक प्रकारें सांगितलें; तथापि तो बोलला, मी तुजसीं मित्रता करीन, अथवा उपोषण करून येथेंच प्राण त्यागीन, कारण अग्नीच्या आंचीनें सुवर्णादिक एकत्र होतात, निमित्तेंकरून मृग, पक्षी मित्रत्व पावतात, भयास्तव अथवा लोभास्तव मूर्खांचें मित्रत्व घडतें; परंत साधूंची मैत्री दर्शनानेंच होत्ये. मृत्ति-

केचा घट लौकर फुटतो आणि पुनः सांधत नाहीं, अशी दुर्जनांची मैत्री. सुवर्णकलश लौकर फुटत नाहीं, आणि फुटला तर सांधतो; याप्रमाणें सज्जनांची मैत्री आहे. तें ऐकून हिरण्यक ह्मणतो, तुझ्या भाषणानें मी संतोष पावलों; आतां तुझें मित्रत्व असो. या पुढें उभयतां एकचित्तें रहावें. उपकार करील तो मित्र, अपकार करील तो शत्रु, असें जाणून शुद्ध चित्तें वर्तावें. याप्रमाणें संकेत ठरवून हिरण्यकानें कांहीं भक्ष लघुपतनास देऊन आपल्या बिळांत गेला, काकही त्याची आज्ञा घेऊन स्वस्थानास जाता झाला. नंतर त्यांची मैत्री अत्यंत होऊन एकमेकांस आहार देऊन ते नाना प्रकारच्या गोष्टी बोलूं लागले. एके दिवसीं लघुपतन मूषकास बोलतो, मित्रा, येथें आतां भक्षण मिळत नाहीं; ह्मणून स्थानांतरीं जावायास इच्छितों. तें ऐकून हिरण्यक

पुसतो, कोठें जातोस ? तो सांगतो. दंडकारण्यांत कर्पूरगौर सरोवरीं मंथर नामा कांसव माझा मित्र राहतो, तो मला अनेक प्रकारचे मत्स्य देऊन रक्षील, यासाठीं मी त्याजकडे जातों. तें ऐकून हिरण्यक बोलतो, सख्या, तेथें मलाही न्यावें; मी देशांतरीं जावयास इच्छितों. तेसमयीं काक पुसतो, तूं कां जातोस ? हिरण्यक ह्मणतो तेथें गेल्यावर सांगेन. मग लघुपतन हिरण्यकास घेऊन त्या स्थानीं गेला; त्या दोघांस पाहून मंथराने दोघांचें आतिथ्य केलें. तेव्हां लघुपतन मंथरास ह्मणतो, हा हिरण्यक महापरोपकारी आहे, याणे चित्रग्रीव सपरिवार बंधनापासून सोडविला, तें पाहून मीही याशीं मित्रता केली. तें ऐकून कूर्म संतुष्ट होत्सातां हिरण्यकास पुसतो, मित्रा, या निर्जनवनांत यावयाचें प्रयोजन काय ? तेव्हां मूषक सांगतो.

चंपकावती नगरींत चूडाकर्ण नामा संन्यासी आहे, तो प्रतिदिवशीं भोजन करून बाकीचें अन्न भिक्षापात्रांत घालून, शिंक्यावर ठेवून निजत असे. तें अन्न भक्षून मी तेथें सुखानें रहात होतों. तेथें एके दिवशीं दुसरा एक संन्यासी वीणाकर्ण नामा आला. रात्री त्याच्या बरोबर चूडाकर्ण गोष्टी बोलत असतां, हातांत काठी घेऊन त्या अन्नाचें रक्षण करीत होता; त्या वेळेस वीणाकर्ण ह्मणाला, माझ्या कथेचा अनादर करून मध्यें दुसरा व्यापार काय करतोस ? तेव्हां तो बोलला, तुझ्या गोष्टीचा अनादर करीत नाहीं, परंतु हा मूषक माझ्या पात्रांतील अन्न नित्य भक्षितो, याचें निवारण करितों. तेवेळेस तो शिंक्याकडे पाहून त्यास ह्मणतो, स्वल्पबळ ह्या उंदीर इतकी उंच उडी कशी मारतो ? तस्मात् येथें कांहीं कारण आहे. तें ऐकून तो ह्मणतो, बहुधा ये-

थें द्रव्य असेल. कां, लोकांत धनवंत बलवान असतात, राज्यासही कारण द्रव्य होय, तेणें-करून सर्व सिद्धि होत्ये. बरें तर काय आहे तें पाहूं. असें बोलून त्या संन्याशानें भूमी खणून माझें वित्त घेतलें. त्या दिवसापासून मी शक्तिहीन झालों. मग मला भक्षण मिळेना ह्मणून दुसरे दिवशीं हळूहळू चालत असतां संन्याशानें पाहिलें, तेव्हां तो बोलला पहा हा मूषक आतां आपल्या जातीशीं समानत्व पावला. हें ऐकून मी चित्तांत विचार केला कीं, आतां येथें रहाणें ठीक नव्हे, हें दुसऱ्यास सांगूं नये; कां, अर्थनाश, गृहछिद्र, दान, मान, आपमान, आयुष्य, धन, हीं बुद्धिमंतानें प्रगट करूं नयेत; आपलें दैव विपरीत झालें असतां, पराक्रम, आणि यत्न, व्यर्थ होतात. यास्तव धनहीनास वनावांचून सुख नाहीं. जेथें मी पराक्रमानें होतों तेथें दीनत्वानें रहाणें उत्तम नव्हे. असा

फार दुःखित होऊन तुझ्या मित्राचे समागमें या स्थानीं आलों. असें त्याचें वर्तमान श्रवण करून मंथर ह्मणतो, सख्या, या अवस्थेच्या ठायीं धैर्य धरून, स्थानत्यागाचे श्रम मानूं नको, कां, साधु कोठेंही गेले तरीं मान्यता पावतात, जसा सिंह वनांतरास गेला तरी तृण भक्षीत नाहीं गजासच भक्षितो. यास्तव तुला सांगतों, उत्साहवंत, संतोषी, धैर्यवान्, शुद्धचित्त, शूर, अशांचें सेवन लक्ष्मी आपणच करित्ये. तूं द्रव्यहीन झालास, तथापि संतोष युक्त आहेस, यास्तव तुला जें सुख तें धनाशेने भ्रमण करणारास नाहीं. दुसरें ऐक, अभ्रच्छाया, खलप्रीति, नवीनतृण, यौवन, धन हीं बहुत दिवस रहात नाहींत. यास्तव हीं नष्ट झालीं तरी शोक करूंनये; आणि भक्षणाविषयीं काळजी करूंनये; कां, ज्याणे गर्भांत घातलें त्याणे जन्माच्या पूर्वीं मातेच्या स्तनीं दूध

निर्माण केलें, तो आयुष्य मर्यादेपर्यंत पालन करणार नाहीं कीं काय ? हें सर्व तुला कळतें, कां, तूं सूज्ञ आहेस. आतां स्नेहाने मजपाशीं सुखरूप रहावें. याप्रमाणें मंथराचें भाषण श्रवण करून लघुपतन बोलतो, मंथरा ! तूं सर्वगुण संपन्न, आणि सज्जन आहेस; साधूंची विपत्ति साधूच दूर करितात, असें समजून आह्मी तुझ्या समीप आलों. असें बोलोन मोठ्या वृक्षावर जाऊन बसला. नंतर स्वाभाविक इकडे तिकडे अवलोकन करीत असतां, कांहीं एक भयकारण जाणून त्या दोघांस बोलला; तुह्मी आपल्या ठिकाणीं लपून बसा. मग मंथर उदकांत गेला, उंदीर बिळांत शिरला, कावळा वृक्षाग्रीं बसून पाहूं लागला, तों कांहीं दिसले नाहीं. मग ते तिघे तेथें गोष्टी सांगूं लागले. इतक्यांत चित्रांग नामा हरण त्यांच्या समीप येऊन बोलला, मी लुब्धकाच्या

भयास्तव तुह्माजवळ रहावें ह्मणून आलों, तें ऐकून मंथर त्याचा सन्मान करून ह्मणाला, हें तुझेंच घर असें समजून सुखरूप रहावें. नंतर तोही त्यांजवळ मित्रपणें राहिला. मग कोणे ऐके दिवशीं चित्रांग मृग तृण भक्षावयास स्थलांतरीं गेला तो संध्याकाळीं आला नाहीं ह्मणून कांसव चिंताक्रांत होऊन बोलला आज हरण कां आला नाहीं? तें ऐकून सर्व खिन्न झाले. मग प्रातःकाळीं कावळा उड्डाण करून चहूंकडे अवलोकूं लागला, तों चित्रांग चर्म पाशेंकरून बद्ध असा पाहिला. मग त्याच्या जवळ जाऊन ह्मणतो, मित्रा, तुला ही अवस्था कशी घडली? तो बोलला आतां हें पुसून फळ नाहीं, तर तूं जाऊन हिरण्यकास लौकर घेऊन ये; जोंवर लुब्धक आला नाहीं, तोंपर्यंत तो माझे पाश तोडून मला सोडवील, व्याध आल्यावर उपाय चालणार नाहीं. असें ऐ-

कतांच त्वरेने जाऊन त्यांस सर्व वृत्तांत सां-
गून हिरण्यकास घेऊन आला. मग त्याणे
विचारिलें, तूं चतुर असतां पाशांत कसा सां-
पडलास? हरण ह्मणतो, पूर्वीं मी लहान होतों,
तेव्हां पारध्याने पाश लावून माझा सर्व समु-
दाय कोंडिला; परंतु ते प्रौढ ह्मणून त्याजवरू-
न उडून गेले; मला पळावयास शक्ति नव्हती,
यास्तव लुब्धकानें मला धरून राजाजवळ नेलें.
त्याणे आपले पुत्राचे स्वाधीन केलें. तेथें मी
बहुत दिवस होतों. एकेसमयीं मेघाची ग-
र्जना ऐकून मी फार चंचल होऊन मनुष्य वा-
णीने मनोगत बोललों कीं, वायु, वृष्टि, यांहीं-
करून पीडित मृग समुदाय धांवत असतां
त्यांच्या मागून मी धांवेन काय? तें ऐकून रा-
जपुत्राने मजकडे पाहिलें. मग कांहींसा उगा-
च राहून बोलला; याणे मनुष्यवाणी कशी उ-
च्चारिली? तस्मात् हा कोणी विचित्र प्राणी आ-

हे. असें मानून भयानें ज्वरयुक्त झाला. नंतर प्रातःकाळीं ज्योतिषी ब्राह्मणास बोलावून त्यांस हा वृत्तांत सांगितला. तेव्हां ते बोलले, सर्व पशु मनुष्या सारिखें बोलतात; परंतु आपल्या समक्ष बोलत नाहींत. त्याणेंही तुला न पाहतां भाषण केलें. यास्तव तूं भिऊं नको, हा कोणी विचित्र प्राणी नव्हे, यापासून तुला किमपि भय नाहीं. असें ऐकून राजपुत्रानें मला सोडिलें. नंतर या वनांत आलों. मला एथील माहितगारी नाहीं ह्मणोन मी बंधन पावलों; तर यापासून मला लौकर सोड. इतक्यांत सुहृद्भावास्तव मंथरही तेथें आला; आणि हिरण्यकास ह्मणतो, मित्रा! विलंब लावलास हें ठीक नव्हे, कां, आतांच व्याध आला तर आह्मी सर्व पळून जाऊं; परंतु चित्रांग पाशबद्ध आहे हा सांपडेल; यासाठीं मला खेद वाटतो; कारण चित्तांतील जाणता असा

मित्र, मनोहर स्त्री, परदुःख जाणता प्रभु, हे दुर्लभ आहेत. असें मंथर बोलत असतां अकस्मात् तो पारधी यमासारिखा लघुपतनानें दुरून पाहिला. नंतर मूषकास सांगतो, सख्या, व्याध आला, हें मोठें संकट प्राप्त झालें. तें ऐकून हिरण्यकानें अतित्वरा करून चित्रांगाचे पाश तोडिले. तों पारधीही जवळ गेला, त्यास पाहून सर्व पळाले. तेव्हां तो खिन्न होऊन चहूंकडे अवलोकूं लागला, तों मंथर आपल्या गतीनें मंद मंद चालत होता त्यास पाहून धरिला; आणि आपल्या धनुष्यास बांधून कांहीं संतुष्ट होऊन चालला. त्यास पाहून मृग, मूषक, काक, हे फार श्रमी होऊन आतां काय करावें असें बोलून पारध्याचे पाठीमागें जाऊं लागले. तेव्हां हिरण्यक ह्मणाला, एक संकट निवारलें नाहीं तों दुसरें प्राप्त झालें, तस्मात् शरिराच्या समागमें जीवास अनेक

क्लेश भोगावे लागतात, ते क्लेश मित्रत्वामुळें आह्मास आले, कां, मित्राचेठायीं जो विश्वास असतो तो माता, पिता, बंधु यांजपाशीं नाहीं. असा बहुत प्रकारचा शोक केला; तेव्हां हिरण्यक बोलतो, व्याध जोंपर्यंत दूर गेला नाहीं, तोंपर्यंत मंथर सुटावयाचा उपाय करावा मग होणार नाहीं. तेसमयीं ते ह्मणतात उपाय काय तो सांग. नंतर मूषक सांगतो, चित्रांगानें तळ्याचे कांठीं मेल्याचे सोंग घेऊन पडावें, त्यावर कावळ्यानें बसून लटकेंच टोंचावें, तें पाहून लुब्धक मंथरास भूमीवर ठेऊन हरणासाठीं तेथें येईल इतक्यांत मी कांसवाचे पाश छेदीन; मग तो पाण्यांत उडी टाकील. असें ऐकून सर्वांनीं तसेंच करून मंथरास सोडविला. मग तो व्याध फार श्रमी होऊन आपले घरास रडत गेला; नंतर ते

काक, कूर्म, मृग, मूषक, अत्यंत संतुष्ट होऊन स्वस्थानीं पूर्ववत् राहिले.

---

# तंत्र द्वितीय.

## मित्रलाभ.

### श्लोक

वर्द्धमानोमहास्नेहोमृगेंद्रवृषयोर्वने
पिशुनेनापिलुब्धेनजंबुकेनविनाशितः

---

विष्णुशर्मा राजपुत्रांस सांगतो. कोणी एकावनांत सिंह व बैल या उभयतांचा अतिशय स्नेह होता, तो एके चहाड कोल्ह्याने मोडला. असें ब्राह्मणाचें वाक्य ऐकून राजपुत्रांनी पुसलें हें कसें? तेव्हां विष्णुशर्मा सांगतो.

दक्षिणदेशीं महिलानगरीचेठायीं वर्धमान नामा सावकार होता, त्यास बहुत धन अ·

सतांही अधिक मिळावें अशी इच्छा झाली. शास्त्रांतही तसेंच आहे, जें न मिळालें तें मिळवावें, मिळालें तें रक्षावें, रक्षिलें वाढवावें, आणि वाढविल्याचा सत्पात्रीं व्यय करावा; कां कीं अरक्षित धनाचा नाश होतो, अवर्धमान क्षयास जातें, आणि मिळविल्या द्रव्याचा उत्तम व्यय न केला असतां, कीर्ति आणि सुख हीं मिळत नाहींत. असा विचार करून तो सावकार नानाप्रकारचे जिनस घेऊन उदीम करावयास देशांतरास चालिला; तों मार्गीं अवघड वाटेंत बहुत भारेंकरून थकोन त्याचा संजीवक नामें एक बैल होता, तो पाय निसरून पडला; तेव्हां सावकार गाडा चालता करून दोन सेवक त्या बैलाच्या रक्षणार्थ ठेवून आपण पुढें जाता झाला. मग ते सेवक कांहीं दिवस तेथें राहून निघून गेले, आणि संजीवक मेला असें खोटें वर्तमान सावकारास सांगते झाले.

इकडे संजीवक आयुष्याचे बळेंकरून वांचला, आणि तृणादिक भक्षून अत्यंत पुष्ट होऊन राहिला. त्या वनांत पिंगलनामा एक सिंह श्वापदांचें राज्य करीत होता, तो कोणीएके दिवशीं तहान लागली ह्मणून नदीच्या तिरास गेला होता, तेथें अकस्मात् कधींही ऐकिला नाहीं असा मेघासारिखा गंभीर त्या वृषभाचा मोठा शब्द ऐकता झाला; आणि भिऊन जलप्राशन नकरितां उगाच स्तब्ध राहिला. त्यासमयीं दमनक व करटक, हे दोघे कोल्हे सिंहाच्या प्रधानाचे पुत्र तेथें होते, ते हें कौतुक पाहून परस्पर बोलूं लागले; दमनक करटकास ह्मणतो, हा आमचा स्वामी उदकार्थ जाऊन उदकपान नकरितां कां उभा राहिला? असें त्याचें वाक्य ऐकून करटक ह्मणतो हा विचार आह्मांस कशास पाहिजे? आणि सांगितलेंही आहे; जो व्यापार आपल्यास योग्य नाहीं तो

जो करितो, तो कीलोत्पाटी वानराचेपरी मृत्यु पावतो. असें ऐकून दमनक पुसतो हें कसें? तेव्हां करटक सांगतो.

मगधदेशाचे ठायीं सुदत्तनामा कायस्थ देवालय बांधित होता; त्यासाठीं तक्ते तयार होत होते. एके दिवशीं कामगार चिरीत होते, त्या तक्त्यामध्यें खुंटी मारून दोनप्रहरीं ते जेवायास गेले, इतक्यांत एक वानर येऊन त्यावर बसला आणि त्यांतील खुंटी बळें करून काढिता झाला; त्यांत त्याचें अंग सांपडून चिरडलें, आणि तो तत्क्षणीं मृत्यु पावला; यास्तव अयोग्य व्यापार करूं नये. आमच्या स्वामीनें भक्षून राहिलें जें शेष तोच आमचा आहार, तें भक्षून आह्मी असावें. असें त्याचें वाक्य ऐकून दमनक ह्मणतो कीं स्वामिकार्य नकरितां केवळ आहारार्थ कसें रहावें? मित्रांस उपकार, शत्रूंस अपकार करावा तरच राजाश्रय योग्य. राजाश्रित असतां बहुत लो-

कांस सुख देणें हेंच राजाश्रयाचें फळ, नाहीं तर
कावळाही अन्न भक्षून सहस्रवर्षें वांचतो. त-
साच श्वान अन्नदात्याचे हातीं ग्रासमात्र अ-
न्न पाहून पुच्छ हालवितो, उताणापडून पोट दा-
खवितो, पाय पसरतो आणि दिनमुख करितो;
परंतु हत्ती दात्याकडे न पाहतां, आर्जवही न
करितां, श्वानाहून सहस्रगुण अधिक भक्षितो.
तसेंच भुकेला सिंह, कोल्हा जवळ असतांही
त्यास टाकून हत्तीसच मारितो असें आहे,
यास्तव लोक स्तव करीत असतां जें वांचणें
तेंच धन्य. जसे लहान ओहोळ थोड्या उद-
कानें पूर्ण होतात, किंवा मूषकाची ओंजळ थो-
डक्या धान्यानेंच भरत्ये, तसा मूर्ख पुरुष स्व-
ल्पें करूनच जीविका करितो; हिताहित जाणत
नाहीं, त्या पुरुषास व पशूंस भेद नाहीं. असें
दमनक बोलल्यावर करटक ह्मणतो, आह्मी
प्रस्तुत राज्यकारभारांत नाहीं, भोजन चिंता

मात्र करितों. दमनक ह्मणतो तें खरें, परंतु कांळेंकरून प्रधानही अप्रधान होतो. आपल्या यत्नेंकरून, गुणेंकरून, लघुहीं समर्थ होतो. करटक ह्मणतो बरें तर तूं जाऊन सिंहापाशीं काय बोलशील ? तें सांग. दमनक ह्मणतो आमचा स्वामी भ्याला यास्तव तो मूर्ख आहे हें मी, येथूनच जाणतों. सांगितला अर्थ पशुपक्षीही जाणतात, नसांगतां जाणेल तो पंडित, दुसऱ्याच्या मनांतील गोष्ट जाणावी हेंच बुद्धीचें फळ. यास्तव मी आतांच जाऊन सिंहास आत्मीय करितों. करटक ह्मणतो, तूं अपरिचित असतां राजास आत्मीय कसा करिशील ? दमनक ह्मणतो, मी बोलण्यांत चतुर आहें. समर्थास कोणता भार ? उदमी यास कायदूर ? विद्यावंतास कोणता परदेश ? आणि प्रिय बोलणारास कोणता शत्रु ? करटक ह्मणतो, अकाळीं गेल्यास अपमान होतो, यास्तव कोपाची

व संतोषाची वेळ जाणून जे सेवा करितात ते सुख पावतात. दमनक ह्मणतो अपमान झाला तरीं स्वामीसमीपच असावें; कांकीं, राजाजवळ जो असतो त्यासच राजा कार्य सांगतो, तो सेवक कसाही असो त्याचा विचार करीत नाहीं; जशा वेली जवळच्या वृक्षास वेष्टितात. करटक ह्मणतो. तूं तेथें जाऊन काय बोलशील? तेव्हां दमनक ह्मणतो, उत्तरासारखें प्रत्युत्तर करीन, बृहस्पतिही कदाचित् चुकतो मग इतरांचा पाड काय? कालानुरूप कांहीं बोलल्यास अपमान होतनाहीं; तसेंच ज्याच्या संग्रहेंकरून आपलें हित होतें तो राजानें पाळावा आणि वाढवावा, असें शास्त्र आहे; ह्मणोन आह्मी त्याचें बरें इच्छिल्यास तो आह्मास अधिकार देईल. करटक ह्मणतो, राजे पर्वताप्रमाणें दुर्गम असतात. दमनक ह्मणतो, ज्याचा जसा स्वभाव तसेंच बोलून आपलें हित करावें तें ऐकू-

न करटक ह्मणाला, बरें आहे, जा तुझा विजय असो. नंतर दमनक सिंहाजवळ जाऊन दूरूनच राजास नमस्कार करून राजाज्ञेनें बसता झाला. मग सिंह बोलिला, तूं बहुतांदिवशीं आलास. दमनक ह्मणतो, आपणापाशीं येऊन बोलावें असें कांहीं कार्य प्राप्त झालें, ह्मणून स्वामिचरणाजवळ आलों; नाहींतर येण्याचें प्रयोजन काय ? राजास कोणाचेंही प्रयोजन नाहीं; तथापि दांत कोरायास काडीचेंही प्रयोजन लागतें; मग इतरांचें आश्चर्य काय? ह्मणून मी आपल्यापाशीं बोलतों, राजानें धिक्कारिल्यास गुणवंताचा सद्गुण जातो कीं काय? अग्नि अधोमुख केलातरी ज्वाला खालीं होतील कीं काय ? यास्तव राजाने हें सर्व जाणून सेवकांस योग्य व्यापारीं ठेवावें;मग ते सेवक राजाची कीर्ति वाढवितात. मी कोल्हाह्मणून माझा अपमान करूं नये. विष्णुवराहरूप आहे; परंतु लोक पूजितात

कीं नाहीं? मी स्वामिकार्यास तत्पर आणि चतुर आहें,चतुर प्राणी जवळ नसण्यास अपकीर्ति हो- त्ये. असे त्याचें वाक्य ऐकून सिंह ह्मणतो, दमन- का, तूं आमच्या प्रधानाचा पुत्र. तें ऐकून दम- नक बोलतो, होय महाराज,असें बोलून उगाच राहिला. पुनःसिंह ह्मणतो,आणखी कांहीं बोल. तेसमयीं दमनक बोलता झाला. स्वामी! आपण उदकार्थ जाऊन उदक नघेतां विस्मित होऊ- न उगेच राहिलां याचें कारण काय? तेव्हां सिंह ह्मणतो बहुत दिवस या वनामध्यें सुखरू- प राहिलों, परंतु आतां हें त्यागावें असें प्राप्त झालें; कां ह्मणशीलतर, कधींही ऐकिला नाहीं असा मेघासारिखा मोठा शब्द आज ऐकिला, त्याजवरून असें भय वाटतें कीं, ज्याचा शब्द एव- ढा मोठा तो प्राणीही समर्थ असेल. असें सिं- हाचें वाक्य ऐकून दमनक ह्मणतो, स्वामी! श ब्दें करूनच भिऊं नये, याविषयीं एक गोष्ट आहे.

कोणी एकावनांत कोल्हा क्षुधेंकरून पी- डित होऊन आहारार्थ फिरतफिरत रणभूमीचे- ठायीं आला; तों तेथें मोठा शब्दऐकून अत्यंत भिऊन आपण मेलों असें मानिता झाला. मग कांहींसा पुढें गेला, तों त्याणें एक भेरी पाहि- ली; तिजवर वृक्षाची फांदी वायूनें लागून श- ब्द होतो असें जाणून जवळ गेला; आणि ह्मणतो, आज मला भोजन बहुतादिवसीं प्राप्त- झालें. असें ह्मणून भेरीचें मुख फोडून आंत जाऊन पाहतां, तों काष्ठ आणि चर्म. यास्त- व मी सांगतों, केवळ शब्देंकरून भिऊं नये. आतां मला जर आज्ञा होईल तर हा शब्द जे- थून उत्पन्न झाला त्यास पाहून येईन. असें ह्मणतांच सिंहानें बरें ह्मणून आज्ञा दिल्ही. तदनंतर दमनक संजीवक बैलाजवळ जाऊन त्याशीं गोष्टी बोलून मैत्री करून, सिंहाजवळ येऊन, नमस्कार करून उभा राहिला. तेव्हां

सिंह बोलिला, तूं जाऊन तो प्राणी कोण आहे हें पाहिलें कीं काय? तेव्हां दमनक बोलला, आज्ञेप्रमाणें जाऊन पाहिला. तो आपण जसा जाणला तसाच पुष्ट महादेवाचा नंदी आहे; परंतु आपल्या दर्शनाची इच्छा करितो; आज्ञा होईल तर फिरून जाऊन त्यास दर्शनास घेऊन होईन. मग सिंह बोलला आण. हें ऐकून त्याणें पुनः संजीवक बैलाकडे जाऊन त्यास सन्मानपूर्वक आणून राजास भेटविला. नंतर कांहीं दिवशीं संजीवक, आणि सिंह, या उभयतांची अत्यंत मैत्री झाली; आणि राजास कोणाचेंही अगत्य नाहीं असें झालें. तेव्हां दमनक व करटक या उभयतांस भक्षावयास कांहीं नमिळे असें झालें; ह्मणोन चिंताग्रस्त होऊन विचार करूं लागले. करटकास दमनक ह्मणतो, हा आमचाच दोष; पूर्वींही असेंच झालें, मेंढ्यांचे युद्धेंकरून जंबुक मेला; आषाढभूती

च्या योगेंकरून संन्याशाचें द्रव्य गेलें; व गोपी-
च्या योगेंकरून दूतीचें नाक गेलें; हीं तिघें आत्म-
दोषेंकरून अनर्थ पावलीं. त्याप्रमाणें आह्मांस
प्राप्त झालें. तेसमयीं करटक ह्मणतो हें कसें तें
सांग मग दमनक सांगतो.

कोणीएक देशांत देवदत्तनामा यती होता,
त्याच्या कंथेमध्यें बहुत द्रव्य भरलेलें होतें, ती
हरण करावी या बुद्धीनें आषाढभूतीनामा एक
ठक शिष्य त्याजवळ येऊन राहिला; त्याणें त्या
संन्याशाची सेवा बहुत केली. एकेदिवशीं तो
विश्वासेंकरून कंथा शिष्यापाशीं देऊन आप-
ण स्नानार्थ बाहेर जाता झाला; तेथें बसून पा-
दप्रक्षालन करितेवेळेस मेषांचे युद्ध होत होतें
तें पहात बसला. तों त्यांचे शृंगांचे थडकेंकरून
रक्त भूमीवर पडलें तें पाहून कोणीएक कोल्हा
तें भक्षावयास आला, तो त्या उभयतांच्या थ-
डकेंत सांपडून मरण पावला. हा अनर्थ पाहून

संन्यासी आश्रमास गेला तों आषाढभूती इक-
डे कंथा घेऊन पळाला. तेव्हां संन्यासी दुःखी
होऊन त्याचे शोधार्थ निघाला, तो संध्याकाळीं
कोणीएक ग्रामांत गोपाचे घरीं राहिला. त्याची
स्त्री व्यभिचारिणी होती, तिला दूतीनें येऊन
बोलाविलें, ह्मणून ती परपुरुषाचे घरीं निघून
चालली होती; इतक्यांत तिचा पति बाहेरून
आला, त्यास पाहून कार्यार्थ गेल्याचें मिष करू-
न घरांत आली. तें कपट जाणून तो तिला
रात्रीस स्तंभाशीं बांधून आपण निजता झाला.
पुनःदूती आली, आणि तिला बोलली कीं, तुझ्या
विरहेंकरून तुझा जार मृतप्राय झाला आहे;
यास्तव मी तुला सोडून आपल्यास बांधून घे-
त्यें, तूं जाऊन त्यास संतुष्ट करून ये. असें
बोलून ती दूती तिला सोडून आपल्यास त्या
ठिकाणीं बांधून घेती झाली. मग तो गोप जा-
गा होऊन कोपेंकरून ताडन करूं लागला; परंतु

ती कांहींच बोलली नाहीं, ह्मणून अधिकच रागें भरून तिचें नाक छेदून निजला. नंतर गोपी घरीं येऊन तिला पुसत्ये काय वर्तमान? मग तिणे सांगितलें कीं, नाकावांचून सर्व यथास्थित आहे. तें ऐकून तिला सोडून आपल्यास बांधून घेऊन पूर्ववत् राहिली. कांहीं वेळानें पति जागा झाला; असें जाणून त्यास ह्मणत्ये, हे दुष्टा! मला व्यर्थ विरूप केलेंस. जर मी बालत्वापासून पतिव्रता असेन, तर माझें नाक पुनः येईल; ही माझी प्रतिज्ञा सर्व लोकपाल ऐकोत. मग पतीनें पाहिलें तों पहिल्याप्रमाणें नाक आहे, तें पाहून ही पतिव्रता आहे असा त्याचा निश्चय झाला; तेव्हां तो तिजला साष्टांग नमस्कार करून क्षमा करावी; असें बोलून सोडिता झाला. हा सर्व वृत्तांत संन्याशानें पाहिला. इकडे दूती नाक छेदिलें तें घेऊन आपल्या घरास जाऊन हें कसें लपवावें? असा विचार करूं लागली; तों

तिचा पति बाहेरून घरास येऊन तीजवळ व-स्त्र्यांची धोंगटी मागूं लागला; तेव्हां तिणें खि-डकींतून एकच वस्तरा बाहेर टाकिला; ह्मणून न्हाव्याने रागेंभरून वस्तरा फिरून घरांत टा-किला. तेंच निमित्त करून ती तें छिन्ननाक हा-तीं घेऊन, बाहेर येऊन मोठा आक्रोश करून बोलली कीं; या दुष्टानें निरपराध माझें नाक छे-दिलें. हें ऐकून राजसेवकांनीं त्या न्हाव्यास राजाजवळ बांधून नेलें. राजानें त्यास पुसलें कीं तूं इचें नाक कां छेदिलेंस? तो कांहींच बो-लला नाहीं. मग आज्ञा केली कीं, यास सुळावर देणे. त्यासमयीं तें कौतुक पहावयास तो सं-न्यासीही तेथें आला होता; तो बोलला कीं, हा अपराधी नव्हे; हें आश्चर्य मला ठाऊक आहे. जसा मेषांचे युद्धेंकरून जंबुक मेला, आणि आषाढभूतीच्यासंगतीनें माझें द्रव्य गेलें, त-सेंच गोपीच्या योगेंकरून इचें नाक छेदिलें.

हे तीनही अनर्थ आत्मकृत जाणावे; यांचा दो-
ष दुसरे कोणाकडे नाहीं. असें संन्याशाचें वाक्य
ऐकून, मागील वर्तमान सर्व समजून घेऊन, रा-
जा नापितास मुक्त करिता झाला. हें ऐकून क-
रटक विचारतो, आतां काय योग्य तें सांग,
दमनक सांगतो, जें गेलें तें पुनःमिळवावें, अ-
प्राप्त तें संपादावें, अनर्थ दूर करावा, याचा जो
विचार त्याचें नाव मसलत. आतां आह्मास
पिंगळक व संजीवक यांच्या मैत्रीमुळें संकट
प्राप्त झालें, तर यांचे मैत्रीस विघ्न करावें; तेव्हां
आह्मास अन्न मिळेल, तेसमयीं करटक ह्मणतो
तें कसें घडेल? दमनक ह्मणतो, उपायें करून
जें सिद्ध होतें तें पराक्रमें करूनही होत नाहीं. या-
विषयीं एक गोष्ट आहे ती सांगतों ऐक.

कोणीएके वनामध्यें एक कावळा वृक्षा-
वर रहात होता. त्याचे स्त्रीस पिलीं झालीं, तीं
त्याच वृक्षाचे ढोलींत कृष्णसर्प रहात होता त्या

णें भक्षिलीं. असें पाहून तीं उभयतां बहुत श्रमी होऊन उपाय काय असें बोलून, उगीच राहिलीं पुनः त्याचे स्त्रीने अंडीं घातलीं तीं पाहून, तो कावळा आपला मित्र जो कोल्हा त्या पाशीं जाऊन पूर्व वृतांत सांगून, आतां पिलांच्या रक्षणार्थ काय करावें ह्मणून पुसता झाला; मग तो कोल्हा सांगतो, जसा बहुत खेंकड्यांचा लोभ दाखवून बक खेंकड्यानें मारिला, तसा हाही उपायें करून मरण पावेल. हें ऐकून कावळा पुसतो, बक कसा मारिला तें सांग. तेव्हां कोल्हा सांगतो.

कोणीएके देशीं एक वृद्ध बक सरोवराचे कांठीं जाऊन आत्मनिंदा करून, खिन्नासारिखा उगाच बसला होता; तेसमयीं त्या सरोवरांतील मत्स्यानीं पुसलें कीं, तूं आपला आहार टाकून उगाच कां बसलास? हें सांग. बक ह्मणतो, मी मत्स्य भक्षक खरा; परंतु आज

कोळी येथें येऊन सर्व मत्स्यांस मारणार आहेत असें झालें असतां माझ्या उपजीविकेचा नाश होईल, यास्तव मी चिंतेनें मृतप्राय होऊन उगाच राहिलों आहें. असें बकाचें वाक्य ऐकून मत्स्यांचे मनांत आलें कीं, ज्याणें अपाय सांगितला, तोच उपाय सांगेल. असा विचार करून ते बकास ह्मणाले तर तूंच आतां आमचें रक्षण कर. बक ह्मणतो, मी कोळ्यांशीं युद्ध करावयास समर्थ नाहीं; परंतु तुह्मांस स्थळांतरास नेईन. तेसमयीं प्राणरक्षणार्थ त्याचा विश्वास मानून मत्स्य बोलले कीं, न्यावें. मग तो बक एकएक मत्स्यास स्थलांतरीं नेण्याच्या मिषानें सर्वांस नेऊन भक्षिता झाला. त्याच सरोवरांत एक मोठा खेंकडा होता; तो बोलला कीं, मलाही त्या स्थळास न्यावें. तेसमयीं त्यास ही बकानें मत्स्य भक्षावयाच्या ठिकाणीं आणिला. तेथें मत्स्यांचीं हाडें पाहून तो विचार क-

रितो कीं, याणें सर्व मत्स्य येथेच भक्षिले; आणि आतां मलाही भक्षील. असें जाणून खेंकडा ह्मणतो, तूं मला आणिलेंस; परंतु माझा परिवार तसाच राहिला; यास्तव मला जर तूं परत तेथें नेशील तर बरें आहे. असें ऐकून, बक लोभाविष्ट, होऊन त्यास माघारां नेऊं लागला, तों खेंकड्यानें अकस्मात त्याची ग्रीवा छेदून टाकिली. अशी कथा सांगून कोल्हा कावळ्यास ह्मणतो जसा तो बक मरण पावला; तसा हा सर्पही पावेल. हें ऐकून कावळा विचारितो, आतां कसें करावें तें सांग, तेव्हां कोल्हा ह्मणतो, सुवर्णाची माळ कोठूनही आणून सर्प रहातो त्या ढोलीचे तोंडावर ठेव; ती घ्यावयास कोणी येईल तो सहजच सर्पास मारील. त्याप्रमाणें कावळ्याने सुवर्णाची माळ आणून ठेविली. ती घ्यावयास जो आला त्याणें सर्प मारिला; आणि कावळ्याचें कार्य झालें. ही गोष्ट सांगून दमन-

क ह्मणतो, उपायें करून सर्वही साध्य होतें. ज्यास बुद्धि त्यास बळ ज्यास बुद्धि नाहीं त्यास बळ कोठून? बुद्धिबळेंकरून एके सशानें सिंह मारिला. तें ऐकून करटक ह्मणतो; हें सविस्तर सांग. दमनक सांगतो.

कोणी एके वनामध्यें मदोन्मत्तनामा सिंह होता, तो संपूर्ण श्वापदांस यथेष्ट भक्षित असे; ह्मणोन सर्व श्वापदांनी मिळून त्याची प्रार्थना केली कीं, हे मृगेंद्रा, असें भक्षिल्यास सर्व मृगांचा निर्वंश होईल. याकरितां आह्मी तुला एक एक मृग नित्य पाळीप्रामाणें देतजाऊं,तो भक्षून रहावें. हें सर्व श्वापदांचें बोलणें सिंहाने कबूल केल्यावर नित्य एकएक मृग देऊं लागले. तदनंतर कोणी एके दिवशीं एके सशावर पाळी आली तेव्हां तो विचारकरूंलागला कीं, मृत्यु आला यास उपाय योजावा. बुद्धिमंतास असाध्य काय? तर आतां मी उपायेंकरून सिंहास मारीन.

याप्रमाणें विचारकरून त्याची भक्षावयाची वेळ चुकवून हळूहळू गेला. तेसमयीं त्या सशास पाहून तो सिंह क्रोधयुक्त होऊन बोलला कीं, अरे विलंब कां लाविलास? तेव्हां ससा ह्मणाला यांत माझा अपराध नाहीं. मार्गी येतानां दुसऱ्या सिंहानें मला भक्षणार्थ अडविलें होतें; परंतु त्यास शपथ वाहून आपणापाशीं आलों. हें ऐकून सिंह बोलिला कीं,दुसरा सिंह कोठे आहे ? तेव्हां ससा ह्मणतो, समीपच आहे; त्वरेंकरून याल तर मी दाखवीन. हें ऐकून सिंह कोपयुक्त होऊन सशामागें चालला. मग ससा सिंहास कोणी एके कूपाजवळ नेऊन यांत आहे; ह्मणून दाखविता झाला. तेव्हां सिंहास सशाची गोष्ट खरी वाटली. आणि तो कूपोदकांत आपलें प्रतिबिंब पाहून, हा दुसरा सिंह असें मानून परम कोपयुक्त होऊन, त्यास मारावें, या बुद्धीनें कूपांत उडी घालून मरण पावला. याकरि-

तां सांगतों कीं, ज्यास बुद्धि त्यासच बळ, हें ऐ-
कून करटक ह्मणतो, तर सिंहाजवळ सुखरूप
जावें; तुझें कल्याण असो. तदनंतर दमनक
पिंगलकाजवळ येऊन, नमस्कार करून, बो-
लता झाला; स्वामी! तुह्मास आज कांहीं अन-
र्थ प्राप्त होणार आहे, असें समजून आज्ञेविरहि-
त सांगावयाकरितां आलों. हें ऐकून सिंह ह्मण-
तो, काय असेल तो सांग. तेमसयीं दमनक सां-
गतो, तुझा मित्र संजीवक विश्वास दाखवून
तुझें राज्य घ्यावयाची इच्छा करितो. तें ऐकून
पिंगलक आश्चर्येंकरून उगाच राहिला. पुनःद-
मनक ह्मणतो, तूं त्या बैलास मुख्यप्रधान केलास
असो आह्मास काय? परंतु राजा आणि प्र-
धान समान झाले असतां लक्ष्मी दोघांतून
एकास टाकिते. जेव्हां राजा एकच प्रधान
करितो, तेव्हां त्या प्रधानास गर्व होतो; यास्तव
तो स्वतंत्र होऊन, लोभेंकरून, राजाचे प्राण

नाशाची इच्छा करितो; ह्मणून अशा मंत्र्याचा समूळ उच्छेद करावा; नाहींतर तो अनर्थ करील, हें मीं आपल्यास सांगावें असें नाहीं, आपण सर्व जाणतच आहां. परंतु मी सांगतों राज्य लक्ष्मीची इच्छा करीत नाहीं असा प्राणी या काळांत दुर्लभ आहे. असें त्याचें भाषण ऐकून सिंह ह्मणतो, संजीवकावरील माझा स्नेह कधीं जायाचा नाहीं. कां, मित्रानें अनेक अन्याय जरी केले, तरी तो प्रियच जाणावा. असें सिंहाचें वाक्य ऐकून दमनक ह्मणतो, हाच बुद्धीस दोष; याणें तुह्मास अपाय घडेल; कां, जो साधूची बुद्धि न ऐकून दुष्टाची बुद्धि ऐकतो तो औषध न घेणारे रोग्यासारिखा विपत्ति पावतो. कर्णास सुखकारक आणि हितकारी असें वचन दुर्लभ आहे. घातकाचें वचनही सुंदर असतें, परंतु तें न ऐकावें. तेसमयीं सिंह बोलला कीं, अभय देऊन जो मी रक्षीला तो

माझा घात कसा करील? दमनक ह्मणतो, श्वानपुच्छासारिखा दुष्टाचा स्वभाव आहे; विषवृक्ष अमृतानें शिंपिला; तथापि गोड होईल कीं काय? आपण न पुसतां मीं वृत्तांत सांगितला; कां, दुसऱ्याचें हित करावें हा साधूचा मुख्य धर्म; अतःपर मजकडे दोष नाहीं. जेसमयीं राजा पामराचे बुद्धिनें संकटांत पडतो तेव्हां सेवकांस दोष ठेवितो; यास्तव मीं सांगितलें. इतकें बोलून दमनक उगाच राहिला. नंतर सिंह ह्मणतो, अरे विपरित होऊन संजीवक माझें काय करणार आहे? त्याचें सामर्थ्य कितो? दमनक ह्मणतो, हा आमचा परिचित नव्हे, याचा पराक्रम, आणि स्वभाव, आह्मी जाणत नाहीं. ज्याचा स्वभाव कळत नाहीं, त्यास आपल्या जवळ ठेवूंनये. जर ठेविला तर जशी डिंडिभाच्या संगेंकरून मंदविसर्पिणी ऊ नाश पावली, तसें होईल. हें ऐकून सिंह पुसतो, हें

कसें तें सांग. दमनक सांगतो.

कोणी एका राजाचे पलंगावर मंदविसर्पिणी नामें एक ऊ बहुत दिवस रहात होती, तिचे घरीं एके दिवशीं डिंडिभनामा ढेंकूण आला, त्यास ऊ बोलली कीं, तूं कालानभिज्ञ आहेस राजशय्येवर रहावयास योग्य नव्हेस, येथून जा, तेसमयीं तो ढेंकूण तिजला नमस्कार करून व प्रार्थून तेथेंच राहता झाला. संकोच्यास्तव तिणेंही मान्य केलें, आणि बोलली कीं, राजा निजेल तेव्हां स्वल्प रक्त प्राशन करून रहा. तें नऐकून तो ढेंकूण राजा जागा असतांच दंश करिता झाला. तेसमयीं राजा सेवकांस बोलिला कीं, येथें दंश कोणी केला तें पाहा. तों तो ढेंकूण पलंगाचे संधींत लपून बसला. मग ते रक्षक दीप घेऊन शय्या पाहूं लागले तेकाळीं मंदविसर्पिणी ऊ सांपडली तिला तत्काळ मारून टाकिली. ही गोष्ट ऐकून सिंह ह्मणतो, संजीव-

काचा दुष्ट स्वभाव कसा हें मला समजेल तेव्हां खरें. दमनक ह्मणतो कीं, जेव्हां तो आपलीं शृंगें तुह्मावर रोंखून अंगावर येईल तेव्हां स्वामीस समजेल. असें बोलून संजीवकाजवळ जाता झाला; आणि आपल्या चित्तांत मोठा विषाद आहे असें त्यास भासविलें. तेसमयीं संजीवक ह्मणतो, मित्रा कुशल आहेस कीं? तेव्हां दमनक ह्मणतो, सेवकास कुशल कोठून? राजास प्रिय असा कोणी आहे कीं काय? याचक सन्मान पावतो कीं काय? यास्तव हा काळ कोण, आपला मित्र कोण, आपली शक्ति किती ? असा विचार निरंतर करीत असावा. हें दमनकाचें वाक्य ऐकून संजीवक ह्मणतो, असें कां बोलतोस ? तेसमयीं दमनक बोलतो, राजाचा विचार कोणासही न सांगावा असें आहे; परंतु तूं माझें विश्वासेंकरून सिंहाशीं इष्टत्व केलेंस, यास्तव मी तुला सांगतों. हा

सिंह तुजवर बहुत क्रोधयुक्त आहे. संजीवका-
स मारून आपल्या इष्टांस तृप्त करीन असें ह्म-
णतो. हें ऐकून संजीवक परम श्रमी होऊन
उगाच राहिला. तेव्हां दमनक ह्मणतो, जें प्राप्त
झालें तदनुसार वर्तावें. संजीवक ह्मणतो तूं बो-
लतोस तें खरें आहे. स्त्रिया अपवित्र जनास
वश होऊन रहातात; आणि राजे दुष्टांस पा-
ळितात. दुष्टाशीं बहुत स्नेह केला तरीं त्यापा-
सून कांहीं फळ नाहीं. जसा अंधास आदर्श
दाखविला, अथवा बधिराचे कानीं मंत्र सां-
गितला तो व्यर्थ होतो. जसे सर्पयुक्त चंदनवृक्ष,
आणि कंटकयुक्त केतकी, तसे दुष्ट वेष्टित राजे
असतात; असा अनर्थ मला प्राप्त झाला. असें
त्याचें भाषण ऐकून दमनक ह्मणतो; हा सिंह
बोलूनच गोड, अंतरीं अत्यंत कठोर आहे; समु-
द्र तरावयास जहाजें, अंधकार नाशार्थ दीप,
आणि हस्तिदमनार्थ अंकुश, असे उपाय आ-

हेत; परंतु दुष्ठाचें चित्त शमावयास कांहींच साधन नाहीं. असें ऐकून संजीवक ह्मणतो, मोठें संकट प्राप्त झालें, हें दूर करावयास मला सामर्थ्य नाहीं. काळाचे तोंडांत जो पडला, त्यास वांचणें कोठून? जे दुष्ट कपटी आहेत ते दोष नसतांही घात करितात, जसा पूर्वीं उंटाचा वध काकादिकानीं मिळून केला. तेसमयीं दमनक विचारितो तें कसें? संजीवक सांगतो.

एके वनामध्यें मदोत्कट नामा सिंह होता त्याचे सेवक एक कावळा, एक वाघ, एक कोल्हा, असे तिघे होते. अरण्यांत फिरत असतां कोणे एके दिवशीं त्यांणीं एका सावकाराचा उंट पाहिला, तेव्हां त्यास पुसलें तूं कोठून आलास? त्याणें आपलें सविस्तर वर्त्तमान सांगितलें. तें ऐकून त्यास सिंहाजवळ नेऊन भेटविला. मग सिंहानें अभय देऊन मंथानक असें त्याचें नाव ठेऊन, त्यास आपल्या समीप ठेविला.

पुढें बहुत काळ गेल्यावर एके दिवशीं सिंहाचे शरिरास समाधान नाहीं असें झालें. तेसमयीं भक्षण मिळवायास सामर्थ्य नाहीं; ह्मणून ह्या तिघांस सांगितलें,आज माझ्यानें भक्षणमिळवत नाहीं, तर तुह्मी जाऊन मला भक्षणार्थ कांहीं आणावें; आणि मी भक्षून जें शेष उरेल तें तुह्मी भक्षावें; ह्मणजे सर्वांची उपजीविका होईल. नंतर सिंहाचे आज्ञेवरून त्यांणी अरण्यांत जाऊन फार शोध केला; परंतु कांहींच सांपडलें नाहीं, त्यावेळेस मंथानक त्यांबरोबर होता; त्याला आपल्यापासून दूर करून कावळा उभयतां जवळ बोलतो, आज मंथानकासच मारावा. या कंटक भक्षिणाराचें आह्मास प्रयोजन नाहीं. असें कावळ्याचें बोलणे ऐकून ते उभयतां बोलले ज्यास आमचे स्वामीनें अभय दिलें आहे, त्यास कसा मारावा ? तेव्हां कावळा ह्मणतो, तर आह्मी सर्व सिंहाचे

ह्यातून मरण पावूं, कां, क्षुधा लागली ह्मणजे, माता पुत्रास टाकिते; आणि सर्पिणी आपल्या अंड्यांस भक्षिते. क्षुधेनें जो पिडित तो कोणतें पातक करील हें कळत नाहीं. तर मी बोलतों असें करावें असें ह्मणोन कावळ्यानें त्यास मसलत सांगितली; आणि सिंहाचे समीप जाऊन ह्मणाला, आज कांहीं मिळालें नाहीं. सिंह बोलला, तर काय उपाय करावा? तेव्हां कावळा ह्मणतो आपल्या स्वाधीन आहार असतां चिंता कां करावी? सिंहानें विचारिलें, आहार कोठें आहे? तेव्हां कावळा बोलतो मंथानकनामा उंट आहे. हे ऐकून सिंह शिव शिव ह्मणून कानावर हात ठेऊन बोलला, मी यास अभय दिलें असतां तुह्मी विपरीत कसें बोलतां? शास्त्रही तसेंच आहे, गाय, पृथ्वी, व धान्य, यांचे दानाहून अभयदान अधिक आहे. असें सिंहाचें भाषण ऐकून कावळा ह्म-

णतो, कुळानिमित्त एकाचा त्याग करावा, ग्रामाचे रक्षणासाठीं एक कुटूंब टाकावें, देशाकरितां एक ग्राम टाकावा आणि आत्मनिमित्त पृथ्वी टाकावी. यास्तव उंटास आपण मारीत नसल्यास आह्मीच तें काम करूं. अथवा तोच आपण मरणाचा अंगिकार करून मला मारा असें ह्मणेल तेव्हां मारावा. असें कावळा बोलल्यावर सिंह उगाच राहिला. तीच आज्ञा मानून कावळा तिघांस घेऊन सिंहासमीप आला, आणि बोलला, आहार कांहीं मिळत नाहीं, तुह्मास उपोषण झालें आहे यास्तव मला भक्षावें. तेव्हां सिंह बोलतो, तुला भक्षून माझी तृप्ति काय होईल? असें बोलतांच कोल्हा बोलला, मला भक्षावें. त्यासही सिंहानें पूर्ववत् उत्तर केलें. तेसमयीं वाघ बोलतो, याउभयतांहून मी पुष्ट आहें; मला भक्षावें. तेव्हां सिंहानें तेंच उत्तर केलें; असा वृत्तांत पाहून मं-

थानक बोलला स्वामी, मी सर्वांपेक्षां मोठा आहें, मला भक्षावें. तें ऐकतांच व्याघ्र आणि कोल्हा ह्या उभयतांनी त्यास तत्काळ मारिलें, आणि सर्वांनी भक्षिलें. अशी कथा सांगून संजीवक ह्मणतो, जेथें बहुत क्षूद्र असतील तेथें सुख नाहीं, प्राण नाशच जाणावा; येथें तसेंच आहे. यास्तव युद्ध करावें हें योग्य, कां युद्धाचेठायीं सन्मुख जो मरतो तो स्वर्गास जातो; अथवा जो शत्रूचा पराभव करितो तो पृथ्वीचें राज्य पावतो. यास्तव शूरास मरण, आणि जीवित, दोन्ही समान. असें त्याचें वाक्य ऐकून दमनक ह्मणतो, शत्रूचा पराक्रम नजाणतां जो वैर करितो तो, समुद्र जसा टिट्टिभापासून पराभव पावला तसा पराभव पावतो. तेसमयीं संजीवक ह्मणतो, हें कसें दमनक सांगतो.

समुद्र तीराचेठायीं कोणीएक टिट्टिभ रहात होता. त्याची मादी अंडीं घालावयाक-

रितां त्यास बोलली, आपल्यास अंडीं घाला-
वयास स्थल पहावें. तेसमयीं तो बोलला, हें-
च स्थल उत्तम आहे. ती ह्मणाली, या समुद्र
तीरीं कांहीं अपाय घडेल. तें ऐकून तो ह्मण-
तो, समुद्र मजशीं वैर करावयास समर्थ नाहीं.
ती बोलली, तुला आणि समुद्राला बहुत अंतर
आहे. आपली व परकीयाची योग्यता जो
पहात नाहीं तो विपत्ति पावतो, आणि पहातो
तो सुख पावतो. हितकारक मित्राचें जो ऐ-
कत नाहीं, तो कूर्म जसा काष्ठापासून सुटून
मरण पावला, तसा नाश पावतो. तेव्हां टिट्टि-
भ पुसतो, हें कसें? मग ती सांगते.

कोणी एका तळ्यांत कंबुग्रीव नामा कां-
सव होता. त्याचे मित्र विकट व संकट नामें
दोन हंस होते. तेथें पर्जन्य पडला नाहीं ह्म-
णून ते हंस परस्पर विचार करूं लागले कीं, हें
तळें आतां शुष्क होईल, याजकरितां येथून दू-

सरे ठिकाणीं जाऊन, जेथें बहुत उदक असे-
ल तेथें रहावें; असा निश्चय करून ती गोष्ट
त्यांणी आपल्या मित्रास सांगितली. तेव्हां
तो बोलला, तुह्मी पक्षेकरून जाल, मी देशांत-
रास कसें जावें ? तेसमयीं ते बोलले, जर आ-
ह्मी सांगतों हें ऐकशील तर तुजलाही नेऊं; प-
रंतु आह्मी तुला नेत असतां मार्गीं कांहीं तूं बो-
लूंनये. असें बोलून एक काठी आणून त्यास
सांगितलें, ही काठी बळकठ धर सोडूं नको;
आह्मी ही घेऊन उभयतां आकाशमार्गें जातों.
असें बोलून ती काठी धरून तिघेजण चालले.
त्यांस कोणीएक नगराचे समीप लोकांनीं पा-
हिलें, आणि नवल करून सर्व एकदांच बोलूं
लागलें कीं, दोनपक्षी एकाकाठीस उचलून ती
काठी कांसवाकडून धरवून त्यास घेऊन जा-
तात, असा मोठा शब्द लोकांनीं केला. तो ऐ-
कून कंबुग्रीव ह्मणतो, हा शब्द कोठून झाला ?

असें बोलतांच काठीपासून सुटून धरणीवर प-
डला, तेथें मांसभक्षक होते त्यांणीं तो तत्काळ
मारिला. ही गोष्ट सांगून टिट्टिभी ह्मणते हि-
तकर्त्याचें वचन ऐकावें. आणखी सांगत्यें ऐ-
क. जो प्राप्त झाल्याचें पूर्वीं विचार करितो तो,
व ज्यासमयीं प्राप्त होतें तेव्हांच विचार करि-
तो तो, हे उभयतांही सुख पावतात, परंतु जें
होईल तें होऊं असें जो बोलतो तो यद्भवि-
ष्य मत्स्याचेपरी नाश पावतो. असें ऐकून टि-
ट्टिभ पुसतो, हें कसें? तेव्हां ती सांगती.

कोणीएका सरोवराचेठायीं अनागतविधा
ता, व प्रत्युत्पन्नमति, व यद्भविष्य असे ति-
घे मत्स्य होते; तेथें कोणी एके दिवशीं मत्स्य-
घातक येऊन बोलले, येथें उदक थोडें आ-
हे यास्तव उद्यां येऊन येथील मत्स्य मारूं. तें
बोलणें अनागतविधाता ऐकून आपल्या मि-
त्रांजवळ जाऊन सांगतो कीं, येथून सत्वर

निघावें येथें सर्वथा न रहावें तेव्हां प्रत्युत्पन्न-
मति ह्मणतो, भय प्राप्त होईल तेसमयीं पाहून
घेऊं; कार्यप्राप्त झालें असतां तें पाहून तशीच
बुद्धि होते. तदनंतर यद्भविष्य बोलतो स्व-
स्थान सोडणें हेंच मूर्खपणा; जें होणार असेल
तें कोठे गेलें तरी चुकत नाहीं. यास्तव मी ये-
त नाहीं. असें बोलून ते दोघे त्याच सरोवरीं
राहिले. मग अनागतविधाता दुसऱ्या ठि-
काणीं गेला. तदनंतर दुसरे दिवशीं प्रातःका-
ळी मत्स्य घातकानीं येऊन जाळें टाकून
मत्स्य धरिले. त्यांत प्रत्युत्पन्नमति सांपडला,
तेव्हां तो मेल्याचें सोंग घेऊन राहिला, त्यास
पाहून हा मेला असें समजून कोळयाने तीरीं
ठेविला, इतक्यांत त्याची दृष्टि चुकवून हळू-
च पाण्यांत शिरला; आणि यद्भविष्य आं-
त सांपडून आतां कसें करावें ह्मणून धावूं
लागला; तों कोळ्यानें धरून मारिला. अ-

शा बोधाच्या गोष्टी त्या टिट्टिभीनें आपल्या प-
तीस बहुत सांगितल्या; परंतु तो ऐकेना. ते-
व्हां निरुपाय होऊन तिणे तेथेंच अंडीं घात-
लीं. तेसमयीं समुद्राने त्याचें सामर्थ्य नजा-
णून अंडीं हरण केलीं. तें पाहून टिट्टिभी महा-
दुःखित होऊन, पतिप्रति बोलली; स्वामी, आ-
पल्यास महा संकट प्राप्त झालें. अंडीं समुद्रा-
ने नेलीं, आतां काय करावें? तेव्हां तो ह्मणा-
ला, तूं भिऊंनको; मी, अंडीं आणीन. असें
बोलून सर्व पक्षी मिळवून गरुडास शरण गेला.
तेसमयीं गरुडानें श्रीविष्णूस निवेदन करून वि-
ज्ञप्ति केली कीं, हा पक्षी फार श्रमी आहे, यास्त-
व याचीं अंडीं देववावीं. तें ऐकून भगवंतानें
पक्ष्याचीं अंडीं सत्वर द्यावीं अशी समुद्रास
आज्ञा केली. समुद्रानें अंडीं आणून दिलीं.
अशी गोष्ट सांगून दमनक ह्मणतो, शत्रूचा
पराक्रम न जाणतां वैर करूंनये. संजीवक

पुसतो, सिंहाचे युद्धाचा प्रकार कसा, तो सांग. तेव्हां दमनक ह्मणतो, जेव्हां तो कर्ण ऊर्ध्व करून पुच्छ उचलील तेव्हां जाणावें कीं, हा मारावयास प्रवर्त्तला; त्यासारिखें पुढें वर्त्तावें. असें संजीवकास सांगून दमनक करटकापाशीं गेला. तेसमयीं करटक पुसतो, काय झालें, तें सांग. मग तो ह्मणतो कार्य सिद्ध झालें, उभयतांचे मैत्रीचा नाश केला; आतां सिंहाच्या क्रोधाचा आकार जसा संजीवकास सांगितला आहे, त्याप्रमाणें करवितों. असें बोलून पिंगलकाच्या समीप जाऊन तसाच त्याणें करविला. मग संजीवक येऊन पहातो तों जसा दमनकानें हावभाव सांगितला होता, त्याचप्रमाणें आहे. असें पाहून अत्यंत विषाद पाऊन पराक्रमें करूनच प्राण त्यागावा असा निश्चय करून युद्धास प्रवर्त्तला. मग उभयतांचें मोठें युद्ध झालें. तें पाहून करटक ह्मणतो, दमनका दुष्टा ! तु-

ह्या योगानें स्वामीशीं, आणि मित्राशीं युद्ध-
प्रसंग पडला. राजनीतीमध्यें साम, दाम, भेद,
दंड; असे च्यार उपाय सांगितले आहेत; परं-
तु त्यांत साम उपाय मुख्य; कारण त्याणें ज-
शी सिद्धि होते, तशी इतरानीं होत नाहीं. द्वेष
असला तरी सामेंकरून जातो, असें असतां तूं
राजास संकटांत पाडिलेंस; राजे नीचाची बु-
द्धि ऐकून संकट पावतात; यास्तव गुणवंताचें
सान्निध्य राजास असावें. कपटी प्रधान बुद्धि-
मंत जरी आहे, तथापि तो राजाचे जवळ नसा-
वा; तसाच आपल्यासच संपदा प्राप्त व्हावी,
ह्मणून राजाजवळ दुसरा कोणी नसावा, अ-
सें जो इच्छितो, तोही राजाचे उपयोगीं नव्हे.
कां बहुत चतुर लोक राजाचे समीप असती-
ल तरच राजा शोभतो. कामी अथवा दुष्ट यां-
च्या समागमेंकरून शोभत नाहीं. आपल्या-
वांचून स्वामीजवळ कोणी नसावें, असें जे इ-

च्छितात ते राजाचे शत्रू जाणावे. तसें तूं हें वाईट कर्म केलेंस. स्वामीचे प्रसन्नतेकरून सेवकानें अधिक नम्र असावें; तें तूं टाकून विपरीत वर्त्तलास. पित्यासारिखा पुत्र होतो नेहीं तूं मिथ्यत्वास पावविलेंस; आतां तुला काय सांगावें? वानरांस बोध करून जसा सुमुख मेला, तसा मी तुझे योगानें मरण पावेन, असें मला वाटतें, याप्रमाणें करटकाचें वाक्य ऐकून दमनक पुसतो, हें कसें तें सांग तेव्हां तो सांगतो.

कोणी एकेसमयीं वानर हिंवानें पीडित होऊन काजव्यांस पाहून, हा अग्नि असें जाणून शेकावयास त्यांजवळ गेले. तेथें वृक्षावर सुमुखनामा पक्षी होता, तो वानरांजवळ जाऊन सांगतो कीं, हे काजवे होत, अग्नि नव्हे. असें सांगताच त्यांतील एका वानरानें कोपयुक्त होऊन त्या सुमुखास शिळेवर आपटून मारिला. असें करटक बोलल्यानंतर दमनक उगाच रा-

हिला; आणि चित्तांत परम खेद मानून मी हें पाप केलें असें बोलला. पुनः करटक ह्मणतो, अशा कर्मेंकरून दुष्टबुद्धिसारिखा तूंही नाश पावशील. तेव्हां दमनक ह्मणतो, दुष्टबुद्धि कसा नाश पावला तें सांग. करटक सांगतो.

दुष्टबुद्धि आणि सुबुद्धि असे वाण्याचे पुत्र द्रव्य मिळवायाकरितां देशांतरास गेले. तेथें सुबुद्धीस भूमींत द्रव्याचा एक हांडा सांपडला. त्याणें तो स्नेहें करून दुष्टबुद्धीस सांगितला. तेव्हां तो बोलला कीं, द्रव्य येथेंच पुरून ठेऊन थोडेसें घेऊन घरास जावें. त्याणे ही स्नेहेंकरून तें मान्य केलें. मग त्यांतील स्वल्प द्रव्य घेऊन शेष द्रव्य वृक्षाखालीं गर्ता करून पुरून ठेविलें. नंतर घरीं येऊन पूर्ववत् स्नेहेंकरून रहात असतां कोणी एकेदिवशीं दुष्टबुद्धि एकटाच जाऊन तें संपूर्ण द्रव्य घेऊन आपल्या घरास आला. नंतर कितीएक दिवसांनीं सुबु-

द्धीस ह्मणतो; तें आपलें द्रव्य घेऊन येऊं. मग उभयतां जाऊन त्या ठिकाणीं पाहूं लगले तों तेथें कांहींच नाहीं. तेसमयीं दुष्टबुद्धि परम श्रमी होऊन सुबुद्धीस बोलला कीं, येथील द्रव्य तूंच नेलेंस, आणि कपटेंकरून श्रमी होतोस असें त्यास बोलून राजास निवेदन केलें. मग राजानें न्यायाधीशास आज्ञा केली कीं, यांची पंचाईत करावी. तेव्हां त्याणें पांचांदिवसांचा अवधिकरून पंचाइतीस आरंभ केला. तेसमयीं दुष्टबुद्धि बोलला, माझा साक्षी आहे, त्या साक्ष्यास आतांच पुसावें. तेव्हां ते ह्मणूं लागले. कोण साक्षी आहे तो आणावा. मग दुष्टबुद्धि घरास जाऊन आपल्या पित्यास ह्मणतो, तुझ्या एका शब्देंकरून मला सहस्रावधि मोहरा मिळतील. पित्याने पुसलें कशा मिळतील तें सांग. तो ह्मणतो, तुह्मी वृक्षाचे ढोलींत रात्रीस जाऊन बसावें, तेथें न्यायाधीशादि येऊ-

न पुसतील, येथील द्रव्य कोणी नेलें? तेव्हां सु-
बुध्दीनें नेलें ह्मणून बोलावें; ह्मणजे माझें कार्य
होईल. असें पुत्राचें वाक्य ऐकून पिता बोल-
ला, अनर्थ प्राप्तीचें कर्म करून सुखप्राप्तीची इ-
च्छा करणें हें बकासारिखें मूर्खपण होय. तेव्हां
तो पुसतो, हें कसें? पिता सांगतो.

कोणीएक मूर्ख बक होता, त्याचीं पिलीं स-
र्पानें भक्षिलीं. तें पाहून तो व त्याची स्त्री, श्रमी
होऊन उगींच राहिलीं. पुनः त्याचे मादीस पि-
लीं झालीं, तेव्हां तीं उभयतां पिलांचें रक्षण क-
सें होईल असा तळ्याचे कांठीं बसून विचार
करूं लागलीं. तेथें त्यांचा मित्र एक खेंकड
होता त्याणें तो विचार ऐकला, आणि पुसलें
कीं, तुह्मी आज चिंताक्रांत कां? तेव्हां त्यां-
णीं, आपला सर्व वृत्तांत सांगितला. तो ऐ-
कून कुळीर बोलतो, तुजला सर्प मारावयाचा
उपाय सांगतों. मुंगसाचे बिळापासून सर्पा-

चे स्थळापर्यंत मत्स्य टाकावें, ह्मणजे कार्य-
सिद्धि होईल. मग त्याणे तसें केलें असतां
नकुळानें आपल्या घरांतून निघून मत्स्य खात-
खात जाऊन सर्पास भक्षून, त्या बकाचीं पिलीं
ही भक्षिलीं. असें पित्याचें भाषण ऐकून, दु-
ष्टबुद्धि आपले पित्यास बळेंच नेऊन, वृक्षाचे
ढोलींत बसऊन, प्रातःकाळीं न्यायाधीशास
आणि सुबुद्धि आदिकरून सर्वांस घेऊन तेथें
गेला, आणि बोलला कीं, साक्षी या वृक्षास
पुसावी. तों वृक्षांतून शब्द निघाला कीं, येथी-
ल द्रव्य सुबुध्दीनें नेलें. हें ऐकून सुबुध्दि वि-
चार करितो कीं, येथें प्राणी नसतां शब्द को-
ठून निघाला? आणि हें सत्य कसें? मग तो वृ-
क्षाचा शोध करूं लागला. तों त्या वृक्षास ए-
क ढोल पाहिली. तेव्हां कृत्रिम असें जाणून त्या-
स अग्नि लाविला. तदनंतर दुष्टबुध्दीचा पिता
अर्धा दग्ध होऊन बाहेर निघाला. त्यासमयीं

सर्वांनीं पुसलें हे काय? तेव्हां तो बोलला, कपटेंकरून दुष्टबुध्दीनें मला येथें बळेंच आणून ठेविलें असें बोलून मरण पावला. हें सर्व वर्त्तमान न्यायाधीशानें राजास सांगितलें. त्याजवरून राजानें दुष्टबुध्दीस सुळावर दिला. असें बोलून पुनः करटक दमनकास ह्मणतो, बहुत दिवस सर्पाचें पालन केलें, तथापि तो दंश करावयास चुकत नाहीं; यास्तव मला आतां तुझें भय वाटतें. यापुढें तुजपाशीं वर्त्तणूक देवदत्तासारिखी करावी लागेल. तें ऐकून दमनक ह्मणतो, देवदत्त कसा वर्त्तला, तें सांग मग करटक सांगतो.

कोणी एकें नगरांत देवदत्तनामा सावकार होता तो द्रव्यहीन झाला ह्मणून द्रव्य मिळवावयाचे उद्देशेंकरून देशांतरीं जावयास निघाला. तेसमयीं त्याचा मित्र त्याच नगरांत राहत होता, त्याजपाशीं आपल्या लोखंडाच्या

कांबी एक हजार ठेवून गेला;आणि घन मातीविषयीं अनेक उपाय करिता झाला; परंतु धन मिळालें नाहीं. मग घरास येऊन आपल्या लोखंडाच्या कांबी मागूं लागला. तेव्हां त्याचा मित्र बोलला कीं, मूषकानीं त्या भक्षिल्या. हें अपूर्व ऐकून बरें असें बोलून देवदत्त घरास गेला. नंतर कांहीं एक दिवशीं त्याचा पुत्र खेळावयाकरितां त्यापासून घेऊन दुसऱ्या घरीं नेऊन ठेविला; आणि पुनः त्याजपाशीं जाऊन बसला. तेव्हां तो पुसों लागला, तुजपाशीं पुत्र होता तो कोठें आहे? मग त्याणे सांगितलें, तुझा पुत्र पक्ष्यानें नेला. तें ऐकून अत्यंत श्रमी होऊन, त्याणे गांवचे अधिकाऱ्याजवळ जाऊन सांगितलें कीं,माझा पुत्र या दुष्टाने नेला, तो लपवून पक्ष्यानीं नेला ह्मणून सांगतो; येणेंकरून माझा प्राण व्याकूळ होतो, तर माझा पुत्र मला देववावा. असें त्याचें बोलणे ऐ

कून न्यायाधीशाने त्या सावकारास बोलावून पुसलें, याचा पुत्र कोठें आहे तो सांग. तेव्हां तो बोलला याचा पुत्र घारीने नेला. हें ऐकून न्यायाधीश बोलला, हें अघटित आजपर्यंत लोकांत झालें नाहीं, आणि तूं कसें ह्मणतोस? तेसमयीं तो बोलला, यांत काय आश्चर्य आहे! जशा लोखंडाच्या कांबी मूषकानीं भक्षिल्या, तसें हेंही घडेल. असें ऐकून न्यायाधीशानें पूर्व वृत्तांत समजून घेऊन सांगितलें, त्याच्या लोहतुळा आणून दे; मग तो तुझा पुत्र देईल. असें सांगतांच ते उभयतां त्याप्रमाणें करून आपल्या घरास गेले. अशी कथा सांगून दमनकास करटक ह्मणतो, सांगितल्याने जो न समजेल तो पाषाण, त्यास उपदेशकरून फळ नाहीं. असें बोलून करटक आणि दमनक, हे उभयतां पिंगलक सिंहाकडे गेले, तों सिंह संजीवकाबरोबर युद्ध करून त्यास मारू-

न, खिन्न होत्साता बसला आहे; असें पाहून दमनक राजास बोलतो, स्वामी, आपण शत्रूस मारून शोक करितां हा अन्याय होय; शत्रूस मारावें असें शास्त्र आहे. पिता, बंधु, पुत्र, मित्र, यांतून जो आपल्या घातास प्रवर्तेल तो राजाने मारावा; व, दयावंत राजा, सर्व भक्षक ब्राह्मण, स्वतंत्र स्त्री, दुष्ट सहाय, विपरीत सेवक, असावध मंत्री, उपकार नजाणता, हे सर्वही नसावेत. दुसरें, सत्य, मिथ्या, कठोर, मृदु, असें भाषण; घात, दया, उदारत्व, कृपणत्व, अनेक प्रकारचें द्रव्यसंपादन, बहुतांशीं मैत्री, असे अनेक गुण वेश्येसारिखे राजनीतींत आहेत; त्याप्रमाणेंच हें आपण केलें. असें बोलून दमनकाने सिंहास संतोषित केला; मग तो सिंह, त्या वनांत पूर्ववत् आपलें राज्य अनुभवून सुखेकरून राहता झाला.

---

# तंत्र तृतीय.

## संधिविग्रह

### श्लोक.

यस्तुपूर्वविरोधीस्यात्तंनृपोनैवविश्वसेत्
दग्धंगृहमुलूकानांकाकेनप्रहितानलात् १

---

विष्णूशर्मा राजपुत्रांस सांगतो, पूर्वी जां- शीं विरोध झाला त्यांचा विश्वास सहसा धरूं नये; धरला असतां जशी कावळ्यानें उलूकां- ची गुहा जाळून त्यांचा नाश केला तसें होईल. याप्रमाणें त्याचें वाक्य श्रवण करून राजपुत्र प्रश्न करितात हें कसें? मग विष्णुशर्मा सांगतो.

दक्षिण देशीं महिलानगरीच्या समीप मोठा एक वडाचा वृक्ष होता, त्याजवर मेघवर्ण नामा कावळ्यांचा राजा सपरिवार रहात होता; तेथें

उरुमर्दन उलूकाधिप समुदाय सहवर्तमान पर्वताच्या गुहेंतून येऊन वटवृक्षा भोंवता रात्रीस फिरून जे काक सांपडतील त्यांस मारून प्रत्यहीं जात असे. त्यामुळें तें स्थान सोडावें असें वायसांस प्राप्त झालें. तेव्हां मेघवर्णानें आपल्या प्रधानांस बोलावून पुसलें कीं, आमचे शत्रु नित्य येथें येऊन काळाचेपरि मारितात, आह्मास तर रात्रीं दिसत नाहीं, व ते कोठें राहातात तें कळत नाहीं, कळल्यास तेथें जाऊन त्यांस मारूं. पहिल्यानेंच शत्रूची उपेक्षा केली तर तो रोगासमान वृद्धिपावून अनर्थ करितो; यास्तव यासमयीं संधि, विग्रह, भेद, आणि दान, इत्यादिक उपायांतून जें उचित तें सांगा. तें ऐकून मंत्री बोलले, राजानें नपुसतां प्रधानानें हित सांगावें. पुसल्यानंतर त्वरेनें कथन करावें, तें नकरतां उगाच जो प्रिय बोलतो, तो स्वामीचा शत्रु जाणावा.

याप्रमाणें भाषण करून पांचही अमात्य का-
य करावें ह्मणून परस्पर विचार करूं लागले.
त्यांत उत्तमजीवि प्रधान, राजास बोलतो,
महाराज! बळवंताशीं विरोध करूंनये संधी-
च योग्य, कां, त्यास नमस्कार करून जे स-
मयास दगा करितात ते सुख पावतात. नद्या
उदकानें पूर्ण झाल्या असतां, जे वृक्ष नम्र हो-
तात ते नाश पावत नाहींत, पुनः तसेच होतात,
संकटकाळीं दुष्टासीं संधि करून प्राण रक्षि-
ल्यास पुढें सर्व संपत्ति मिळतील. जर आ-
पणास अनेक वैरी असले, तर एकाशीं मि-
त्रता करून संपूर्णांचा नाश करावा. भूमि,
मित्र, व धन हे आपल्यापाशीं, व दुसऱ्या-
पाशीं किती याचा विचार करून मग शत्रू-
शीं विरोध करावा. पुरुषानें गरीबाचे वृत्ती-
चा आश्रय करून महासंपत्ति भोगावी, अ-
थवा कूर्मवृत्ती अवलंबून आपल्या उर्जित-

काळीं कृष्ण सर्पवृत्ति आचरावी. कां, जय आणि पराजय हे कोणाचेही स्वाधीन नाहींत. यास्तव शत्रूचें बलाबल पाहून जें कर्तव्य तें करावें. असें त्याचें वाक्य ऐकून राजानें दुसऱ्या प्रधानास विचारिलें कीं, तुझा आशय काय आहे तो सांग. तो ह्मणतो, हा कांहीं उत्तम बोलला नाहीं; कां, मोठें संकट प्राप्त झालें तथापि शत्रूशी संधि करूंनये, अग्नीनें उष्ण केलें जें उदक तें त्यास विझवीत नाहीं कीं काय? तसें आह्मास उलूकानीं त्राशिलें ह्मणून त्यांशीं संधि केला तरी ते घात करितील. विषम ज्वर, अभ्यंग केला असतां जसा वृद्धि पावतो, अथवा तुपानें जसा अग्नि वृद्धिंगत होतो, अशी अवस्था होईल. आपण ह्मणाल शत्रु महान्, आह्मी अल्प, तर त्यास चिंता नाहीं हत्ती मोठा असतो, परंतु सिंहाचा बालक त्यास मारितो. यास्तव उ-

त्साहयुक्त होऊन शत्रूशीं युद्ध करावें; राजा-
चा उग्रदंड पाहून वैरी सहजच भय पावतात.
ज्याचा पराक्रम सर्वत्र प्रसिद्ध, आणि ज्यास
सर्व जाणतात तोच धन्य, नाहीं तर मातेच्या
तारुण्याचा नाश करून फळ काय ? यास्तव
पराक्रमें करून ज्यांचें वांचणें तेच जीवंत, त्यां-
वांचून जे इतर ते शवतुल्य. असें त्याचें वा-
क्य श्रवण करून राजा तिसऱ्या प्रधानास पु-
सतो, तुझा विचार काय तो सांग. तेव्हां तो
बोलतो, राजा शत्रु आपणापेक्षां बलिष्ठ अस-
ला तर त्याशीं संधि अथवा विग्रह न करितां
स्वस्थान सोडून दुसऱ्या ठिकाणीं जावें, हेंच
बरें; कां, हा समय युद्धाचा नव्हे. वैरी ब-
लाढ्य पाहून जो देशत्याग करून जातो तो,
युधिष्ठिराप्रमाणें पुढें सुख पावतो; आणि जो
गर्वयुक्त होऊन युद्ध करितो त्याचा कुलक्षय
होतो. तें ऐकून राजानें चवथ्यास पुसलें. ते-

व्हां तो ह्मणतो, गमन करणें हेंही योग्य दिसत नाहीं; कां नक्र आपल्या स्थानीं असतां गजें-द्रास ही ओढून नेतो; तोच स्थानभ्रष्ट झाल्यास श्वानही त्यास नेतात. यास्तव आपल्या ठिकाणीं राहून इष्ट मित्र मदतीस बोलावून अ-रीचा नाश करावा. शत्रु येतो ह्मणून जो भयानें स्थान टाकून जातो, तो फिरून त्या स्थानीं येत नाहीं. दांतावांचून सर्प, मदरहित हत्ती, स्थानहीन राजा, हे सर्वांपासून पराभव पावतात; आणि आपल्या ठिकाणीं राहिला तर एकटाच शंभरांशीं युद्ध करितो. यास्तव दुर्ग, आणि प्राकार, सिद्ध करून त्यांच्या आश्रयानें शत्रूशीं संग्राम करावा, जय झाल्यास लक्ष्मी, मरण आल्यास स्वर्ग, आहेच. ह्मणून स्थानाचा त्याग करूंनये; जसा बद्धमूल वृक्ष वायूनें नाश पावत नाहीं; आणि तोच सुस्थळीं नसला तर वायू त्यास पाडितो. ह्मणून

जें कर्तव्य तें येथें राहून करावें. याप्रमाणें त्याचें मनोगत समजून नृप पांचव्या मंत्र्यास पुसतो, तुझा अभिप्राय कसा आहे? मग तो ह्मणतो, स्वामी, माझा विचार असाच आहे; कां, आश्रयावांचून समर्थही तेजोहीन होतात. यास्तव कोणाचा तरी आधार करावा. तोही स्वस्थानीं राहून संपादावा, कां, स्थानत्याग केल्यास मग कोणी शब्देंकरूनही साहित्य करणार नाहीं. जेव्हां अग्नि तृणादिकांच्या योगानें वन जाळायास समर्थ होतो, तेव्हां वायू मित्रपणें साहाय्य करितो, तोच दीपरूप होऊन अंतरी राहतो, त्यासमयीं वाराच त्याचा नाश करितो. समर्थाचा आश्रय तर सर्वांस महत्वाचें कारण होतो; जसा कमल पत्रावर जलबिंदु मुक्ताफळाची शोभा पावतो. तस्मात् आश्रयावांचून कोणतेंही कार्य होत नाहीं; ह्मणून दुसऱ्याचा आश्रय करावा, हेंच

माझें अनुमत. नंतर मेघवर्ण राजा पित्याचा, मंत्री चिरंजीवी नामा त्यास नमस्कार करून ह्मणतो, तुमच्या समक्ष सर्वांस मी पुसलें, त्याचीं उत्तरें ही तुह्मास ऐकविलीं; आतां यांत जें योग्य असेल तें तुह्मी सांगा. असें राजाचें वाक्य ऐकून वृद्ध मंत्री बोलतो, सर्वही शास्त्राचे आधारानें बोलले हें योग्यच आहे; परंतु शत्रु बळवंत झाल्यास त्यास विश्वास दाखवून त्याचा नाश करावा; अथवा दुर्गादिकांवर राहून आपलें आणि शत्रूचें बलाबल जाणून जें करणें तें करावें, हेंच विहित होय. कां स्त्रिया, कुमित्र, शत्रु, द्यूत, यांविषयीं सत्यानें परिणाम होत नाहीं. देव, द्विज, गुरु, यांचेठायीं सत्यानेंच वर्तावें लागतें. याप्रमाणें वृद्ध मंत्र्याचें वाक्य श्रवण करून मेघवर्ण पुसतो, दुसऱ्याचें छिद्र कसें समजावें? तेव्हां चिरंजीवी सांगतो, घातस्थानें अनेक प्र·

कारानें जाणण्यांत येतात. ब्राह्मण वेदानें, गाई गंधेंकरून, राजे गुप्त सेवक पाठवून, इतर जन प्रत्यक्ष नेत्राने जाणतात. मेघवर्ण विचारितो, वायस आणि उलूक यांचें वैर कां पडलें? तेव्हां वृद्ध मंत्री सांगतो.

एके दिवशीं मयुरादि सर्व पक्ष्यांनीं मिळून विचार केला कीं, आमचा राजा गरुड असतां आह्मास लुब्धकादिक मारितात यांपासून रक्षण नकरितां तो हितअहितही पहात नाहीं; तर असा राजा असून फळ काय? यास्तव राजाच नसो; असें ह्मणावें तर जशी नौका नावाड्यावांचून परतिरास जात नाहीं; तसेंच आह्मास कोणी स्वामी असल्याविना आमचे संरक्षण होणार नाहीं; ह्मणून सर्व पक्ष्यांचा राजा उलूक करावा. असा निश्चय करून राज्याभिषेकास साहित्य सिद्ध केलें. नाना प्रकारचीं वाद्यें वाजूं लागलीं. नंतर उ-

णजे सर्वांस विपुल जल मिळेल. याप्रमाणें निश्चय ठरवून तेथें गेले आणि स्वच्छ उदक पाहून संध्याकाळपर्यंत जलक्रीडा करून तीरास येऊन बसले. तेथें बहुत ससे रहात होते, त्यांतून कित्येक हत्तींच्या पायांखालीं मेले कित्येकांचे हात पाय मोडले, कोणाच्या अंगाचा चुराडा झाला, आणि कोणी रक्तानें भरले. याप्रमाणें त्यांची अवस्था झाली; तेव्हां कांहीं ससे एकत्र होऊन विचार करूं लागले कीं, गजांचा समुदाय येऊन आज आमचा नाश झाला, याप्रमाणेंच नित्य होईल; कां येथें जवळ दुसरें पाणी नाहीं. असें आहे कीं, हत्तीच्या स्पर्शानें, सर्पाचे चाटण्यानें आणि दुर्जनाचे सन्मानानें प्राणनाश होतो. यास्तव या गोष्टीस कांहीं उपाय योजावा. कित्येक ह्मणाले आत्मरक्षणार्थ देश त्याग करावा असें आहे ह्मणून हें स्थान सोडावें. . तें ऐकून दुसरे बोल-

ले, आपल्या वडिलांचें स्थान टाकून दुसरे ठि· काणीं नजातां हत्तींस भयप्रद होय अशी यु· क्ति काढावी. जसा निर्विषही सर्प फणा का· ढितो, विष असो अथवा नसो. परंतु फणेचा आकार पाहून लोक भितात. तें ऐकून दुसरा एक ससा बोलला, मी हत्तींस भय होईल अ· सा एक उपाय सांगतों. आमचा स्वामी वि· जयदंत नामा ससा चंद्रमंडळीं रहातो, त्याणें दू· त पाठविला आहे असें निमित्त करून कोणा· स तरीं हत्तींकडे पाठवावा, ह्मणजे आमचें का· र्य होईल. असें ऐकतांच सर्वांनीं निश्चय क· रून लंबकर्ण नावाचे एके सशास सांगितलें कीं, तूं चतुर, दुसऱ्याचें समाधान करणारा, दूतकर्मीं निपुण असा आहेस, तूं गेलास तर आमचें रक्षण होईल; तुलाच जावयास सांग· ण्याचें कारण कीं, मूर्ख दूत पाठविला तर का· र्यनाश होतो. असें बोलून त्याणीं त्यास पाठ·

विलें. मग तो जाऊन हत्ती जावयाचे वाटेवर उंच स्थान पाहून बसला. नंतर हत्ती येऊं लागले तेव्हां त्यांचे राजास बोलतो, अरे दुष्टा गजा, निर्भयपणें नाना प्रकारची क्रिडा या डोहांत येऊन करितोस; यास्तव तूं मेला जाशील. असें सशाचें भाषण ऐकून गज ह्मणतो, तुझें भाषण श्रवण करून मी बहुत विस्मित झालों; तर तूं कोण आहेस तें सांग? तेव्हां तो सांगतो, मी विजयदंत राजाचा दूत आहें, तो राजा चंद्र मंडळीं राहातो ह्मणून चंद्रानें मला तुजकडे पाठविलें. याप्रमाणें त्याचें बोलणें ऐकून हा समर्थाचा आहे, असें समजून हत्ती त्यास ह्मणतो, चंद्राची आज्ञा काय आहे? मग तो पुनः सांगतो, तूं येथें येऊन निर्भयपणें क्रिडा करून बहुत ससे मारिलेस; तथापि मी क्षमा केली; आतां तुला जिवाची इच्छा असली तर पुनः येथें येऊं नको. याप्रमाणें चंद्रा-

ची आज्ञा होती, ती मी तुला सांगितली, आ-
तां याचें प्रत्युत्तर सांग ह्मणजे स्वामीस नि-
वेदन करीन. तेव्हां गज बोलला, त्याजवळ
मला ने, मग मी तुझ्या स्वामीस नमस्कार क-
रून दुसरे सरोवरास जाईन. असें त्याचें बो-
लणें ऐकून ससा ह्मणतो, तूं एकटा माझ्या स-
मागमें ये, तुला स्वामी दाखवितों. मग दोघे ब-
राबर जात असतां तळ्याचे जवळ गेले; ते-
थें ससा गजास बोलतो, हा चंद्र जळांत आ-
ला आहे; यास नमस्कार करून लौकर जा;
नाहीं तर त्याच्या समाधीचा भंग झाल्यामुळें
त्यास अधिक राग येईल. तेसमयीं गजही
भय पावून चंद्रबिंबास नमस्कार करून गेला.
त्या दिवसापासून ससे तेथें सुखरूप राहिले. ही
कथा सांगून कावळा इतर पक्ष्यांस बोलतो,
थोराचें ह्मणविल्यानें विपत्ति दूर होतात, दुष्टा-
चा समागम क्षणभर जरी झाला, तरी नाशहो-

तो. जसा ससा आणि कपिंजल, हे उभय-
तां भांडून तीक्ष्णदंताजवळ जातांच मृत्यु पा-
वले. असें ऐकून पक्षी पुसतात हें कसें? म-
ग कावळा सांगतो.

पूर्वी मी एका वृक्षावर रहात होतों, त्याचे
ढोलींत कपिंजल पक्षी होता; तो आणि मी
संध्याकाळीं नानाप्रकारच्या गोष्टी सांगून सुखा-
नें रहात होतों. एके दिवसीं तो दुसऱ्या पक्ष्यां-
बरोबर गेला आणि संध्याकाळीं आला नाहीं,
ह्मणून मी विचार केला कीं, हा पाशेंकरून
बद्ध झाला किंवा कोणी मारिला कीं काय?
कां कधीं हा दुसरे ठिकाणीं राहिला नाहीं.
अशी चिंता करीत असतां तिसऱ्या दिवशीं
त्याच्या कोठऱ्यांत कोणी ससा येऊन शिर-
ला त्यास मी बहुत प्रकारानें सांगितलें, तें
न ऐकतां तो बळेंच तेथें राहिला. नंतर कांहीं
दिवसांनीं कपिंजल यथेष्ट साळी भक्षून, आ-

पले स्थळास येऊन पहातो तों आपल्या घरांत ससा राहिला आहे. मग त्यास तो ह्मणाला, अरे सशा तूं माझ्या घरांत राहिलास हें ठीक नव्हे, तर लौकर येथून निघोन जा. ससा बोलला,अरे मूर्खा हें तुझें घर नव्हे माझेंच आहे. तूं व्यर्थ, मिथ्या भाषण करून लाभावांचून मैत्री कां तोडितोस? वापी, कूप, तटाक, देवालय, धर्मशाला, यांजवर सत्ता उत्सर्गा नंतर कर्त्याकडे नाहीं. दुसरें ज्याणे दाहा वर्षेंपर्यंत लोकांदेखतां गृहाचा उपभोग केला, तें गृह त्याचेंच याविषयीं साक्षी व लेखाचें प्रयोजन नाहीं असा विचार मनुष्यांत आहे; परंतु पक्ष्यांत जो बळकट असेल तो राहातो. याप्रमाणें धर्मन्यायें करून पाहातां घर माझें. तेव्हां कपिंजल ह्मणतो, जर तूं धर्मशास्त्र मानितोस तर तूं आणि मी शास्त्रज्ञाकडे जाऊन त्यास पुसूं, मग तो ज्यास रहा

असें सांगेल तो राहील. याप्रमाणें निश्चय करून दोघेही विवाद करीत चालले. त्यांच्या मागून मीही हा न्याय कसा होतो ह्मणून पहायास गेलों. वाटेंत एक तीक्ष्णदंत नामक मार्जार त्याचें भाषण ऐकून विचार करितो हे निर्णयार्थ जातात, तर यांस आपण ठकवावें, असा निश्चय करून त्यांच्या वाटेवर नदी तिरीं डोळे झांकून वर मान करून बसला. आणि ते जवळ आलेसे पाहून बोलतो, अहो हा संसार असार आहे, यांत प्रीय समागम क्षणभंगूर, स्वप्नाप्रमाणें आहे, ह्मणून धर्माचा त्याग करून दुसरी गती नाहीं. धर्मावांचून ज्याचे दिवस जातात तो श्वासोश्वास सोडितो खरा; परंतु भात्यासारिखा निर्जीव जाणावा जसें दह्यांचें सार तूप, तिळांचें सार तेल, तसें वांचण्याचें सार धर्म आहे. हा टाकून केवळ आहार भक्षून जे राहातात ते व्यर्थ; ह्मणून मी

शोक करितों. हे जनहो, धर्म बहुत विघ्नें करून युक्त आहे, यास्तव थोडाच धर्म सांगतों. परोपकारासमान पुण्य, व परपीडेसारिखें पाप नाहीं. यावरून आपल्यास जें दुःखदायक तें परासही तसेंच होय हें धर्माचें रहस्य सर्वदां चित्तांत ठेवावें. याप्रमाणें त्याचें भाषण ऐकून शशक कपिंजलास बोलला, धर्मवादी मार्जार नदी तीरीं बसला आहे त्यास आमचा न्याय पुसावा. कपिंजल, बोलला, हा आमचा स्वाभाविक शत्रु, यास्तव यास दुरूनच सांगावें, असा निश्चय करून त्यास ते दोघे ह्मणतात, हे तपस्विन् ! तूं धर्मज्ञ आहेस, ह्मणून आमचा उभयतांचा वाद ऐकून धर्म शास्त्रानुरूप न्याय करावा; आणि जो खोटा ठरेल त्यास मारावा. असें त्याचें बोलणें ऐकून, मार्जार कानावर हात ठेऊन ह्मणतो, मारावा असा शब्द पुनः बोलूं नका, कां

हें नरकाचें साधन सोडून मी धर्माचा आश्रय केला आहे. साधू सांगतात कीं, व्याघ्रादिक हिंसकांसही जे मारितात ते नरकास जातात. मग इतरांचे वधानें जातील यांत आश्चर्य काय ? मी तुह्मास सर्वथैव भक्षणार नाहीं, तुमचा न्याय मात्र करीन, परंतु मी वृद्ध झालों ह्मणून मला दुरून ऐकूं येत नाहीं, तर तुह्मीं जवळ येऊन परस्परांचा वाद काय आहे तो सांगा. तो ऐकून इहलोकीं व परलोकीं सुखावह असेल तें सांगेन. लोभास्तव अथवा क्रोधाने जो अन्यथा करील, तो अधोगतीस जाईल. असें समजून तुह्मीं माझे कानाजवळ येऊन आपला वृत्तांत कळवा. याप्रमाणें तो मार्जार बोलला, ह्मणून विश्वासानें दोघेजवळ आले. नंतर त्याणें त्या दोघांस पायांनीं धरून एकदांच भक्षिले. अशी कथा सांगून कावळा ह्मणतो दुष्टाचा आश्रय केला तर

योंपक्ष्यांप्रमाणें अवस्था होईल, हें जाणून जें योग्य दिसेल तें करावें. याप्रमाणें कावळ्याचें बोलणें ऐकून सर्व पक्षी ह्मणाले याणे उत्तम सांगितलें तर आतां हें असेंच ठेऊन दुसऱ्या राज्याविषयीं पुनः सर्वांनीं मिळून निश्चय करावा. असा विचार ठरऊन सर्व आपआपल्या ठिकाणीं गेले. तेसमयीं उलूक स्त्रीसहित सिंहासनाजवळ बसला होता, तो आपल्या मादीस ह्मणतो, प्रिये! मंगलस्नान झालें, आतां राज्याभिषेक कां करीत नाहीं? तेव्हां तीं बोलली तुझ्या राज्याभिषेकास वायसानें विघ्न केलें. ह्मणून सर्व पक्षी आपापल्या घराल गेले, एक काक मात्र राहिला आहे. असें तिचें भाषण ऐकून उलूक वायसास ह्मणतो, अरे दुष्टा! तुझें मीं काय वाईट केलें होतें ह्मणून माझ्या कार्याचा नाश केलास? तर आजपासून तुझ्या आणि माझ्या जातीशीं परस्पर वैर असो; कां, खड्गानें

छेदिलें अथवा बाणानें वेधिलें तरीं बरें, परंतु शब्दाचें क्षत जात नाहीं; असें बोलून उलूक स्त्रीसहित आपल्या स्थानास गेला. मग कावळा चित्तांत खिन्न होऊन ह्मणतो, अशी गोष्ट बोलून मी व्यर्थ वैर संपादिलें. सभेंत चतुरानें परनिंदा करूं नये, व जें करणें तें इष्ट मित्रांस विचारून करावें. असें नकेल्यामुळें मी संकटांत पडलों. याप्रमाणें पश्चात्ताप पावून तोही आपल्या जाग्यास जाता झाला. त्या दिवसापासून उलूकांचें व आमचें वैर वंशपरंपरेनें चाललें. असें वृद्ध मंत्र्याचें भाषण ऐकून मेघवर्ण राजा पुनः त्यास पुसतो कीं, आतां काय करावें? तेव्हां तो ह्मणतो, मी उलूकांपाशीं जाऊन त्यांस वंचना करून मारितों; जसा एके ब्राह्मणास धूर्तांनी ठकाविला. तें ऐकून राजा पुसतो हें कसें? मग मंत्री सांगतो.

एके देशांत मित्रशर्मा ब्राह्मण होता, त्यां- णें माघमाशीं यज्ञार्थ पशु मिळवावयाकरितां ग्रामांतरास जाऊन एका गृहस्थाजवळ पशु मागितला. तेव्हां हा धर्मकार्यार्थ मागतो, ह्म- णून त्याणें मोठा चांगला पशु दिला. तो घे- ऊन येत असतां पशु इकडे तिकडे धांवूं ला- गला, ह्मणून ब्राह्मण त्यास खांद्यावर घेऊन चालला. ती गोष्ट कित्येक धूर्तांनीं दुरून पा- हून विचार केला कीं, या ब्राह्मणास ठकवून हा पशु घेतला तर सर्वांची क्षुधा शांत होईल. नंतर त्यांतून एक धूर्त येऊन बोलतो, हे अ- ग्निहोत्री ब्राह्मणा, तूं शिष्ट असून हें निंद्य कर्म कां करितोस? अत्यंत नीच जो श्वान तो खां- द्यावर घेऊन कसा चाललास? शास्त्रांत ही सां- गितलें आहे, श्वान, कुक्कूट, चांडाल, रासभ हे स्पर्शासही योग्य नव्हत. असें त्याचें भा- षण ऐकून द्विज कोपयुक्त होऊन ह्मणतो, तूं

यज्ञ पशूस श्वान कसा बोलतोस? तुझे नेत्र गेले कीं काय? मग तो ह्मणतो, ब्राह्मणा! कोप करूंनको, सुखरूप जा. नंतर कांहींसा पुढें गेला, तों दुसरा धूर्त येऊन बोलतो, हे ब्राह्मणा, हा मृत वत्स जरीं तुझे प्रीतीचा होता, तरी आतां यास खांद्यावर घेणें ठीक नव्हे; कां, पशूंच्या शवास जो स्पर्श करितो तो चांद्रायण अथवा पंचगव्य, यांवांचून शुद्ध होत नाहीं; अशा निषिद्धास स्कंधीं कां घ्यावा? तेव्हांही ब्राह्मणानें पूर्ववत भाषण केलें आणि मार्ग क्रमूं लागला. इतक्यांत तिसरा कपटी बोलतो, हे द्विजा, रासभास जो शिवतो त्यास सचैल स्नान सांगितलें असतां तूं त्यास कसा घेऊन जातोस. तेव्हां अग्निहोत्री ह्मणतो, या पशूचे लोक नानाप्रकारचे तर्क करितात तस्मात् हा कोणी भूत असेल; असें चित्तांत मानून त्यास भुमीवर सोडून तो आपल्या गृ-

ह्रास गेला. मग त्या धूर्तांनी तो पशु मारून भक्षिला. वृद्धमंत्री मेघवर्ण राजास ही कथा सांगून बोलतो, याप्रमाणें मी तुझ्या शत्रूची वंचना करून तुझें कार्य करीन; परंतु मी जो उपाय सांगतो तो कर. तूं शत्रूपक्षींचा आहेस असें ह्मणून माझी निंदा करून दुसऱ्याचे रक्तानें मला भरून वडाखालीं टाक, नंतर तूं परिवारा सहित पर्वतावर जाऊन रहा, ह्मणजे उलूकांस कळेल कीं, मी शत्रूंशीं प्रतिकुळ आहें मग मी त्यांस विश्वास दाखवून दुर्गादि भेद करून, त्यांचा वध करीन. तोंपर्यंत तूं तेथे रहा. हा विचार मी पूर्वींच करून आतां तुला सांगितला. असा त्याचा मनसोबा ऐकून मेघवर्ण ह्मणतो, अत्यंत प्रिय जो प्राण तोही त्वां तृणवत् मानिलास तो तूं धन्य होस. तेव्हां प्रधान बोलतो, राजकार्याकरितां सेवकानीं असेंच करावे; कां संकटकाळीं से-

वक उपयोगीं पडतील, ह्मणूनच राजे दान मा-
नेंकरून त्यांचें रक्षण करितात. ते त्यावेळे-
स उपयोगीं नपडल्यास पाळिल्याचें फळ का-
य ? असें बोलून त्या मंत्र्यानें राजाशीं मिथ्या
कलह आरंभिला, तो दुसऱ्यांस ठाऊक नव्ह-
ता, ह्मणून ते यास मारावयास सिद्ध झाले.
तेव्हां मेघवर्ण त्यांस बोलला, तुह्मीं यास सि-
क्षा करूं नका, कां, हा शत्रूचें हित करणारा दु-
ष्ट आहे यास्तव यास शासन मीच करीन. असें
त्यांस सांगून उड्डाण करून चंचुपुटानें लटकेंच
त्यास प्रहार करून, संकेताप्रमाणें वडाखालीं
टाकून, मेघवर्ण समुदायासहित दुसरे ठिका-
णीं गेला. नंतर सूर्यास्त होतांच उलूक राजा
तेथें येऊन वृक्षाभोंवता वेढा घालून वाय-
सांस पाहूं लागला, तों कोणींही तेथें नाहीं. म-
ग आपल्या समुदायास पुसतो, काक कोण-
त्या मार्गानें गेले ? ती वाट तुह्मांस ठाऊक अस-

ली तर आतांच जाऊन त्यांस मारूं, जोंपर्यंत शत्रूनीं दुर्गाचा आश्रय केला नाहीं तोंवर ते साध्य आहेत मग असाध्य होतील. याप्रमाणें ते भाषण करीत असतां चिरंजिवीनें हळूच शब्द केला तो ऐकतांच बहुत उलूक जाऊन त्यास मारूं लागले. तेव्हां तो ह्मणतो, मी चिरंजिवी नामा मेघवर्ण राजाचा मंत्री आहें त्या दुष्टानें माझी अशी अवस्था केली, ह्मणून मी तुमच्या राजास शरण आहें. असें त्याचें वाक्य ऐकून तें सेवकानीं उरुमर्दनास सांगितलें. तेसमयीं तो विस्मययुक्त होऊन त्याचे जवळ येऊन पुसतो, हे चिरंजिवी, तुझी अशी दशा कां झाली? मग तो हात जोडून बोलतो, पहिले दिवशीं तुह्मीं काक मारिलेत, त्यांच्या ईर्षेकरून तो दुष्ट मेघवर्ण तुह्माशीं युद्धार्थ सिद्ध झाला; तेव्हां मी बोललों, राजा! तुला हें योग्य नव्हे, बलवानांशीं निर्बला-

नें युद्ध केलें तर दीपनाशार्थ पतंग जातो तशी अवस्था होईल; यास्तव त्यांशीं संधि करून जें मागतील तें शत्रूंस देऊन बुद्धिमंतानें प्राण रक्षावा. धन वारंवार मिळतें, परंतु प्राण दुर्लभ आहे. असें मी बोललों असतां तूं शत्रूपक्षाचीं भाषणें करितोस असें ह्मणोन त्याणें माझी अशी अवस्था केली. आतां मला तुझ्या पायांचा आश्रय आहे. मी जर या क्षतापासून बरा झालों तर संपूर्ण वायसांस मारून तुझी सेवा करीन. याप्रमाणें त्याचें बोलणें श्रवण करून उलूक राजा, क्रूराक्ष, रक्ताक्ष, दीप्ताक्ष, क्रूरनाश, वक्रनाश, अशा आपल्या पांच प्रधानांस पुसतो कीं, हा शत्रूचा मंत्री आमचे हस्तगत झाला यास काय करावें? तेव्हां रक्ताक्ष प्रधान सांगतो, हा त्याचा आद्य मंत्री समय विशेषें करून त्यास प्रतिकूल वाटला तथापि कांहीं दिवसांनीं याचें वचन तो अन्य-

था करणार नाहीं. यास्तव हा आपल्या ज-
वळ ठेवून याचे हातानें शत्रूशीं संधि करावा
हेंच योग्य; कां, सामादि च्यार उपाय आहेत
त्यांत दंड कनिष्ठ, ह्मणून याचा प्रयोग शेव-
टीं करावा. सामेंकरून जीं कार्यें केलीं तीं
कदापि विपरीत होत नाहींत; ह्मणोन एकाएकीं
दंड योजूं नये. शर्करा भाक्षिली असतां जर
पित्तनाश होतो तर कडू औषधें किमर्थ सेवा-
वीं ? माझ्या मतानें सामकरावें हें उत्तम. अ-
सें त्याचे भाषण ऐकून अरिमर्दन दुसऱ्या प्र-
धानास पुसतो कीं, तुझा अभिप्राय काय आ-
हे तो सांग. मग क्रूराक्ष बोलतो, राजा, स्वा-
भाविक वैरी हे काक, यांशीं साम योग्य नव्हे
येथें भेद योग्य. असाध्य वैरी असले तर
त्यांच्या दायादांस पीडावें, अथवा धनेंकरून
किंवा मिथ्या पत्रें देऊन, त्यांचें परस्पर वैर
पाडावें, कां अभ्यंतरीं छिद्र पडलें असतां मो-

तींही बंधन पावतें. यासाठीं माझें वचन ऐ-
कून स्वपक्षाचे रक्षण करून परपक्षाचा भेद क-
रावा. हा काक वैरी जरीं आहे, तथापि मा-
रावयास योग्य नाहीं; कां, कदाचित् शत्रूही
हित सांगतो. जसें चोरानें ब्राह्मणाचें जीवि-
त, आणि राक्षसानें त्याचें गोयुग्म वांचाविलें.
तें ऐकून राजा पुसतो, हें कसें? मग क्रूराक्ष
सांगतो.

एकेनगरांत दरिद्री ब्राह्मण रहात होता,
त्याला एका यजमानानें गाईचीं दोन वासरें
दिल्हीं. मग त्याणें तृणादिक आहार घालून
तीं मोठीं पुष्ट केलीं. त्यांस पाहून एक चोर
हातीं दांवें घेऊन त्यांच्या हरणार्थ निघाला.
तों वाटेंत ज्याचे दंत विक्राळ, नासिकादीर्घ-
केश पिंगट, नेत्र आरक्त असा एक ब्रह्मराक्षस
पाहून तो चित्तांत भय पावला आणि त्यास
पुसतो तूं कोण आहेस? मग तो ह्मणतो,

मी सत्यवचन नामा राक्षस आहें परंतु तूं को-
ण? तेसमयीं तो ह्मणतो, मी चोर, एके दरिद्री
ब्राह्मणाच्या दोन गाई आहेत त्या हरण करा-
वयास जात आहें. तेकाळीं तो बोलला मि-
त्रा, तो ब्राह्मण पवित्र आहे, यास्तव मीही
त्यास भक्षीन, ह्मणजे दोघांचें कार्य होईल.
असें त्याचें बोलणें ऐकून उभयतां तेथें गेले,
तां ब्राह्मण निजला होता त्याला भक्षावा ह्म-
णून राक्षस चालला; त्यास चोर बोलतो, गड्या!
मी त्याचें अगोदर गोयुग्म नेईन, मग तूं त्यास
भक्ष. तेव्हां राक्षस ह्मणतो, सख्या, गाईच्या
शब्दें करून जर ब्राह्मण जागृत झाला, तर हा
सर्व उद्योग राहील. यास्तव अगोदर मी
त्यास भक्षितों, मग तूं निर्भय गाई ने. चोर
ह्मणतो, तूं त्यास खाऊं लागशील त्या वेळेस
जर दुसरा कोणी आला तर तो मला नेऊं दे-
णार नाहीं; ह्मणून मी गोयुग्म हरण केल्यावर

तूं यास भक्षावें. असा उभयतांचा वाद होऊं लागला, तेणेंकरून विप्र जागा झाला. त्यास चोर ह्मणतो, हे ब्राह्मणा! हा राक्षस तुला भक्षीन ह्मणतो, तें ऐकून राक्षस सांगतो, हा चोर तुझ्या गाई न्यावयास आला. याप्रमाणें उभयतांचें भाषण श्रवण करून, ब्राह्मणानें हातीं दंड घेऊन, चोराचें निवारण केलें. असा त्या क्रूराक्षाचा अभिप्राय समजून अरिमर्दन राजा दीप्ताक्षास पुसतो कीं, तुझा आशय काय? तेव्हां तो सांगतो. राजा! साम, आणि भेद, हे दोन्ही मला मान्य नाहींत; कां, सामें करून शत्रूस मान होतो; आणि यास तुझा भेद समजला तर हा कदाचित् घातही करील. यास्तव बुद्धिमंतानें दानें करून शत्रूस वश करावा, आणि वाढवावा; मग तो सहजच हस्तगत होतो. दुसरें कारण, हा त्याशीं विरुद्ध होऊन आह्मापाशीं आला ह्मणून, आमचा

संतोष करून शत्रूचें न्यून असेल तें सांगेल; यास्तव याचें रक्षण करावें, ह्मणजे परस्पर प्रीति भाषणानीं कालहरणही घडेल, आणि आमचें वर्म रक्षील. एकमेकाचीं वर्में जे रक्षीत नाहींत, ते उदरस्थ सर्प व वारुळांतील सर्प यांसारिखे नाश पावतात. तेव्हां उलूक राजा पुसतो हें कसें? मग दीपाक्ष प्रधान सांगतो.

कोणी एक विष्णुशर्मा या नावाचा राजा होता, त्याच्या पोटांत सर्परोग उत्पन्न होऊन तो दिवसानुदिवस क्षीण झाला; ह्मणून देशांतरास जाऊन एका देवळांत राहिला. तेथें बलिराजा राज्य करीत होता. त्याच्या दोन कंन्या होत्या, त्या एके दिवशीं बापाजवळ आल्या. त्यांतून एक बोलली, राजा! जय पाव. दुसरी ह्मणाली हित भक्षण कर. असें दुसरीचें भाषण ऐकतांच तो कोपयुक्त होऊन मंत्र्यास बोलला, अहो, ही दुष्टभाषिणी रोग्या-

स द्यावी, ह्मणजे हितभोजन अनुभवील. अशी राजाची आज्ञा होतांच मंत्र्यानें देवळांत जो राजपुत्र रोगी होता त्यास ती दिली, मग ती त्या यतीची सेवा ईश्वरासमान करून त्याला घेऊन, दुसऱ्या देशास चालली. तों वाटेंत एके ठिकाणीं उतरून आपण सेवक बरोबर घेऊन सामग्री आणावयास गेली. इतक्यांत विष्णुशर्म्यास झोंप लागली, तेव्हां राजाचे पोटांत सर्प होता तो बाहेर निघाला, आणि तेथें जवळच वारुळांत एक सर्प होता, त्याची याची गांठ पडली; मग ते दोघे बोलूं लागले. इतक्यांत राजाची स्त्री येऊन त्यांचे भाषण ऐकत वृक्षाआड उभी राहिली, तों वारुळांतील सर्प ह्मणतो, हे दुरात्म्या! सुंदर राजपुत्रास तूं कां छळितोस? तेसमयीं उदरस्थ सर्प बोलतो; मोहरानी भरलेल्या हांड्यावर राहून त्यास तूं कां दूषितोस? तेव्हां वारुळाचा भुजंग ह्मणतो

दुष्टा, मोहऱ्या या राजानें भक्षिल्या तर तुझा नाश होईल; आणि राजा सुख पावेल. परं- तु हें कोणी जाणत नाहीं. मग तो बोलतो, कढत तेल तुजवर कोणी ओतिलें तर तूंही म- रशील, आणि हांडा त्यास सांपडेल. असें बोलून ते दोघे आपले स्थानीं गेले मग रा- जाच्या बायकोनें ते सर्प मारिले. याप्रमाणें दीपाक्षाचें वचन ऐकून राजानें वक्रनाशास पु- सलें, तेव्हां तो ह्मणतो, हे तिघेही चांगले बोलले नाहींत; कां, साम, दान, भेद, असे उपाय अ- शक्तांस सांगितले आहेत; परंतु समर्थांनीं श- त्रूंस दंडच करावा; तें टाकून जो सामादि उ- पाय योजितो तो भ्याला असें समजून शत्रु त्याजवर चालून येतात; यास्तव राजानें दं- डेंकरून लक्ष्मी मिळवावी. पराक्रम नस- ला तर जें दैवानें प्राप्त होईल तें भोगावें. स- र्व जनांस श्रीची इच्छा आहे, परंतु जे उद्दाम दं-

डें करून वैऱ्यांचा पराभव करितात, त्यांचेच स्वाधीन लक्ष्मी होते. आळशी पुरुष दुर्लभ वस्तूचे सारिखें लक्ष्मीचें सेवन करितात; आणि जो पराक्रमी तो आपल्या शौर्येंकरून लक्ष्मीस अनेक प्रकारें भोगितो. यास्तव बलवंतानें शत्रूंस मारावें. असें त्याचें बोलणें ऐकून राजा क्रूरनाशास विचारितो कीं, तुझ्या मनांत काय आहे? तेव्हां तो ह्मणतो, महाराज, हा आपल्यास शरण आला, ह्मणून यास मुख्य करून शत्रूचा वध करावा. पूर्वीं रामचंद्रानें बिभीषणास आग्रेसर करून रावणादिकांचा जसा नाश केला, तसें आपण करावें. दुसरें कारण जो शरणागतास मारितो त्यास रौरव नरक प्राप्त होतो; ह्मणून शिबिराजानें आपलें मांस ससाण्यास देऊन कपोत सोडविला, असें भारतांत सांगितलें आहे. तसेंच कोणी एक कपोताजवळ त्याचा वैरी येऊ

न कांपूं लागला त्याचे अतिथ्यासाठीं त्याणें अग्नींत उडी घातली. याप्रमाणें क्रूरनाशाचें भाषण ऐकून अरिमर्दन पुसतो हें कसें? मग तो सांगतो.

एके अरण्यांत लुब्धक, हस्ताचेठायीं पिंजरा व पाश दंडादि शिकारीचें साधन घेऊन फिरत असतां अकस्मात् मोठा पर्जन्य येऊन अंधकार पडला आणि प्रलयकाळासमान वायुही सुटला. तेव्हां तो पारधी सकंप होऊन वृक्षाचे आश्रयानें उभा राहून ह्मणतो, भगवंता यासमयीं तुजवांचून कोणी रक्षिता नाहीं. इतक्यांत त्या वृक्षावरचा कपोत पक्षी आपली मादी आली नाहीं याकरितां चिंतायुक्त होऊन बोलतो, आज कांता कां आली नाहीं? तिला कोणी धरिले कीं काय? तिजवांचून हें कोठें शून्य दिसतें, ज्या घरांत स्त्री नाहीं तें घर स्मशानवत् भासतें, व ज्याची भार्या पतिव्रता

भ्रताराचें हित करणारी आहे, तोच धन्य. असें त्याचें खेदयुक्त भाषण ऐकून त्या झाडाखालीं लुब्धकाचे पिंजऱ्यांत त्याची स्त्री होती, ती दुःखित होऊन मनांत ह्मणत्ये, पूर्वजन्मीं जे पाप करितात त्यांस नाना प्रकारचीं बंधनें, रोग, दारिद्र, अशीं दुःखें प्राप्त होतात. असो ज्यासमयीं जें होणार तें कदापि चुकत नाहीं मग पिंजऱ्यांतून आपले पतीस बोलत्ये, अहो, हा लुब्धक आपल्या गृहास आला, याचें शीतवातादि दुःख हरण करून सत्कार करावा; कां अतिथी येतो त्याचें अतिथ्य न केल्यास तो आपले पाप घरधन्यास देऊन, त्याचें पुण्य घेऊन जातो. यास्तव याणें माझ्या मादीस धरिलें, हा विषाद मनांत न आणितां, याचें यथाशक्ति पूजन करावें. अशी कपोतीची वाणी श्रवण करून कपोत ह्मणतो, लुब्धका तुझें स्वागत असो; तूं आपल्या चित्तांत कांहीं

शंका न धरितां स्वगृहाप्रमाणें राहून जें अपे-
क्षित असेल तें माग. तेव्हां व्याध ह्मणतो,
कपोता ! माझें शीत दूर कर. मग त्याणे अर-
ण्यांतून एक अंगार आणून शुष्क पर्णावर ठेवून
प्रदीप्त केला, आणि बोलतो, या अग्नीनें आप-
लें शीत निवारण कर. दुष्कर्मानें मी पक्षी
झालों ह्मणून माझ्याजवळ तुझी क्षुधा जाई
असा पदार्थ नाहीं. तर आतां अनेक क्लेशां-
चें स्थान असें जें शरीर याणे परोपकारही घ-
डत नाहीं, तें ठेवून फळ काय ? येणेंकरून तूं
आपला आत्मा संतुष्ट कर. असें बोलून तो
कपोत परोपकारार्थ त्या प्रदीप्ताग्नींत संतोषानें
प्रवेश करिता झाला. तेव्हां व्याध ह्मणतो,
अहो, माझ्यासाठीं याणें देह त्याग केला;
आणि मी दुराचारी दुसऱ्याचे मांसानें जी-
विका करितों, परोपकार किंवा करुणा कि-
मपि जाणत नाहीं; त्या मला धिक्कार असो.

मी घोर नरकास जाईन हें मला प्रत्यक्ष या क-
पोतानें सुचविलें; तर आजपासून उपवास व
शीतोष्ण सहन, याणें देह शुष्क करून मी निः-
पाप होईन. असें बोलून आपला पिंजरा व दं-
डपाशादि साहित्याचा विध्वंस करून त्या क-
पोतीस सोडिता झाला. मग प्राणापेक्षां प्रिय
जो भर्ता त्याणें धर्मार्थ शरीर त्याग केला अ-
सें पाहून तिणेंही त्याच अग्नीमध्यें उडी घात-
ली. तेव्हांच ती दिव्य स्त्री होऊन पतिसहित
स्वर्ग लोकास गेली. लुब्धकही पश्चात्तापानें
शुद्ध होऊन अग्नींत शरीर ठेऊन उत्तम गतीस
गेला. असें क्रूरनाशाचें वाक्य ऐकून अरिम-
र्दन ह्मणतो, माझाही असाच अभिप्राय आहे;
कां, हा सत्यवक्ता व बुद्धिमान् आहे कपटी न-
व्हे, हें न जाणतां मेघवर्णानें याचा मानभंग
केला; यास मारिला असतां विश्वासघात-
की मी होईन. ब्रह्महा, सुरापी, चोर, इत्या-

दिकांस प्रायश्चित आहे परंतु विश्वासघात-
क्यास नाहीं; यास्तव यास सन्मान करून आ-
पल्या दुर्गावर न्यावा. असा निश्चय करून
राजा चिरंजिवीस बोलतो, तूं माझ्या दुर्गास
येऊन सुखरूप रहा, तुझें रक्षण मी करीन. या-
प्रमाणें त्याचें वाक्य ऐकून चिरंजिवी चित्तांत
संतुष्ट होत्साता ह्मणतो, महाराज मी बहुत का-
य सांगूं? माझी कुलीनता स्वामीस सहवासा-
नें कळेल. तेव्हां वक्रनाश बोलतो, आतां उ-
लूकांचें सर्व कूळ राजाचे दोषानें नाश पावेल.
कां, इतरांचे दोष राजास निवेदन करावे, परं-
तु राजानेंच हित न ऐकिलें तर काय उपाय
आहे? असें ह्मणत असतां त्याचा अनादर
करून राजानें चिरंजिवीस आपल्या दुर्गी ने-
ऊन ठेविला. मग तो विचार करितो कीं, ज्या-
णे मजला मारावें असें सांगितलें तो सर्वांपे-
क्षां चतुर व स्वामीचा हितकर्ता, इतर सर्व

स्वामीसुद्धां मूर्ख आहेत; यास्तव तो नसल्यास यांस जिंकावयास कठिण नाहीं. मग अरिमर्दन सेवकांस आज्ञा करिता झाला कीं, या चिरंजिवीस सर्व दुर्ग दाखवा. मग राजाज्ञेप्रमाणें सर्व पाहून तो मनांत ह्मणतो, मी जर यांत राहिलों तर सर्व चित्ताभिप्राय सिद्ध होणार नाहीं, व माझें कपट हे जाणतील; यास्तव दुर्गाचे द्वारीं राहून मनोभिलषित करावें. असा निश्चय करून राजास ह्मणतो, महाराज मी वायस ह्मणून आंत राहावयास योग्य नव्हे, तर आपले द्वारीं राहून निःकपट सेवा करून काळहरण करीन. भक्तिमान् आणि पवित्र सेवक कोठें असला तरीं चिंता नाहीं. असें बोलून तो तेथेंच राहिला. तेव्हां वक्रनाश ह्मणतो, राजा व मंत्र्यादिक सर्व तुह्मी मूर्ख आहां हें मी जाणतों, याविषयीं पूर्वीची एक कथा सांगतों.

एका पर्वतावर एक पक्षी रहात होता, त्या-च्या विष्ठेचें सुवर्ण होत असे. तेथें एक व्या-ध गेला त्याचसमयीं पक्ष्यानें मलविसर्जन केलें तें सर्व सुवर्ण झालें. असें पाहून व्या-ध परम विस्मित होऊन ह्मणतो, मी बालत्वा-पासून बहुत अरण्यें फिरलों व पक्षीही अनेक जातीचे पाहिले, परंतु असा पक्षी कोठेंच पाहि-ला नाहीं; यास्तव याला जिवंत धरून न्यावा. अ-सें मनांत आणून त्या वृक्षास पाश लाविला. नंतर तो पक्षी पूर्ववत् येऊं लागला तों अकस्मा-त् पाशांत सांपडला. त्यास व्याधानें पिंजऱ्यांत घालून आपल्या घरास आणिला. नंतर विचार करितो, कीं हा मजपाशीं आहे असें राजास समजलें तर तो पक्षी नेईल व माझाही प्राण घेईल; यास्तव हा गुणनिधी राजासच द्यावा. असा निश्चय करून पक्षी देऊन राजास सकळ वर्तमान सांगितलें. तेव्हां त्याणें रत्नजडित

पिंजऱ्यांत त्यास ठेविला. तें पाहून मंत्री ह्मणतो, ह्या लुब्धकाची असंभावित वार्ता ऐकून यास किमर्थ घेतला ? हा सोडून द्यावा. असें मंत्र्याचें वाक्य श्रवण करून राजानें त्या पक्ष्यास सोडून दिला. मग तो पक्षी राजमंदिराचे शिखरावर बसून बोलतो, प्रथम मी मूर्ख, दुसरा पाशबद्धक, तिसरा मंत्री, चौथा राजा, याप्रमाणें भाषण करून तो उडून गेला. अशी कथा सांगून वक्रनाश प्रधान आपल्या इष्टमित्रांस ह्मणतो, आजपर्यंत या राजाचे आश्रयानें होतों, आतां दुसऱ्या पर्वताचा आश्रय केला पाहिजे; कां जो प्राप्त झाल्याच्या पूर्वीं विचार करितो तो सुख पावतो. जसा जंबुक बिळास हाक मारून सुख पावला तेव्हां ते पुसतात हें कसें ? मग वक्रनाश सांगतो.

एके वनांत दीर्घदंत नामा सिंह होता तो कोणे दिवशीं आहारासाठीं बहुत फिरला;

परंतु कांहींच भक्षावयास मिळालें नाहीं, मग संध्याकाळीं मोठी गुहा पाहून ह्मणतो, इच्या आश्रयानें कोणीं तरी रात्रीं येईल त्यास भक्षावा, अशी कल्पना करून त्यांत लपून बसला. इतक्यांत त्या गुहेंत राहाणारा लंबपुच्छ नामा कोल्हा आला, तों सिंहाचीं पाउलें तेथें उमटलीं तीं पाहून ह्मणतो, सिंह यांत आहे किंवा नाहीं याची परिक्षा करून मग आंत जावें. नंतर दूर उभा राहून अरे बिळा अशा दोन वेळा हाका मारून ह्मणतो, बिळा तूं माझा शब्द ओळखला नाहींस कीं काय? तुझें माझें नित्य संभाषण होतें; आणि आज कां तूं बोलत नाहींस? तर लौकर बोल, नाहीं तर मी दुसऱ्या ठिकाणीं जाईन असें बोलून पुनः हाका मारूं लागला, तेव्हां सिंहास वाटलें, प्रत्यहीं ही गुहा याशीं भाषण करीत असेल, परंतु आज माझ्या भयास्तव बोलत नाहीं, तर आ-

पणच त्यास उत्तर द्यावें असा विचार करून त्या जंबुकास हाक देता झाला. ती ऐकून को-ल्हा दुसरे ठिकाणीं गेला. ह्मणून सांगतों अ-गोदर विचार करून जें करणें तें करावें असें आपल्या मित्रांस सांगून त्यांसहवर्तमान व-क्रनाश प्रधान दुसऱ्या देशास गेला. नंतर चिरंजिवी संतुष्ट होऊन आपल्या मनांत ह्मणतो अहो, आमचें कल्याण लौकरच होणार, ह्म-णून वक्रनाश देशांतरास गेला. आतां सर्व उलूक मारावयास अशक्य नाहीं; कां, ज्याची मंत्री चतुर नाहीं त्या राजाचा नाश त्वरित होतो. चतुर मंत्री कपटी मित्रास शत्रू असें मानितो, असा जाणता यांजवळ आतां को-णीच राहिला नाहीं. यास्तव आपल्या कुळाचे कल्याणासाठीं कांहीं तरी उद्योग करावा. असें मनांत आणून प्रतिदिवशीं एक एक काष्ठ आणून द्वाराजळ ठेवूं लागला. मग पुष्कळ

लांकडें जमलीं असें पाहून सूर्योदयानंतर सर्व उलूक अंधत्व पावले असतां तितकीं लांकडें गुहेच वाटेंत रचून आपण हळूच मेघवर्णाजवळ आला. तेव्हां त्याणें पुसलें, काय वर्तमान? मग चिरंजिवी ह्मणतो, मी शत्रू मारावयाचा उपाय केला आहे परंतु तुह्मी एक एक जळत काष्ठ घेऊन माझ्या जाग्यावर टाका, ह्मणजे सर्व उलूक मरतील. असें त्याचें भाषण ऐकून काकराज विचारितो काय केलेंस? तसमयीं प्रधान बोलतो, महाराज, हा समय सांगावयाचा नव्हे; कां, मी सांगितलें वर्तमान जर वैऱ्यांस कळलें तर ते दुसऱ्या ठिकाणीं जातील, ह्मणजे सर्व उद्योग व्यर्थ होईल. दुसरें कारण जें कार्य त्वरेनें करायाचें त्यास विलंब लावूंनये. असें चिरंजिवीचें वाक्य श्रवण करून मेघवर्ण परिवारासहित ज्वलित काष्ठ घेऊन उलूकद्वारीं टाकिता झाला. त्या-

च्या धुरानें सर्व उलूक घाबरे होऊन बाहेर ये- ऊं लागले, तों मार्ग नाहीं; मग वक्रनाशाचे वाक्य स्मरोन ह्मणाले कीं, त्याचें वचन ऐकि- लें नाहीं ह्मणून हें फळ प्राप्त झालें. याप्रमा- णें भाषण करीत असतां अग्नि प्रदीप्त होऊन सर्व उलूक मेले. नंतर मेघवर्ण आपल्या वृ- क्षावर जाऊन सुखेंकरून राज अनुभवित असतां, चिरंजिवीस पुसतो तूं शत्रूच्या घरीं राहून कसें कार्य साधिलेंस? तेव्हां तो बोल- तो, वक्रनाशावांचून सर्व मूढ होते ह्मणून त्या- णीं त्याचा अपमान करून मला दुर्गांत नेलें. यास्तव तो इष्टमित्रांस घेऊन देशांतरास गेला, बाकीचे उलूक मूर्ख ह्मणून जळून मेले. अ- सेच कृष्णसर्पानें मंडूक स्कंदीं वाहून मारिले हें ऐकून मेघवर्ण पुसतो, सर्पानें मंडूक कसे मारिले? मग चिरंजिवी सांगतो.

एका देशांत मंदविष नामा-सर्प होता, त्या-

ला भक्षण मिळेनासें झालें, ह्मणून बहुत क्षु-
धित होऊन तळयाजवळ आला. त्यांत पु-
ष्कळ बेडूक पाहून विचार करितो कीं, येथें
कांहीं कापट्य केल्याशिवाय आपल्यास आ-
हार मिळणार नाहीं. असा निश्चयकरून डो-
ळे झांकून बसला; तेव्हां मंडूक ह्मणतो सर्पा,
तूं आहाराचा यत्न सोडून उगाच कां बसलास?
तें ऐकून भुजंग बोलतो, मला अभाग्यास आ-
हार कोठून मिळणार ? कां आजच प्रदोषस-
मयीं आहारार्थ फिरत असतां एक मंडूक पा-
हिला, त्याला धरूं लागलों इतक्यांत तो पळू-
न मोठा सत्पात्र ब्राह्मण होता त्याजवळ गेला.
मग मी एका ब्राह्मणाचा पुत्र तळ्यांत स्नान
करीत होता त्याच्या पायांस हाच मंडूक अ-
सेल असें जाणून दंश केला; तो तत्काळ मृत्यु
पावला. त्याच्या पित्यानें परम दुःखास्तव
मला शापिलें, कीं, दुष्ट ! निरपराध माझ्या पु-

त्रास दंश केलास ह्मणून तूं मंडुकांचा वाहक होशील ; आणि त्यांच्याच योगानें जीविका पावशील. याप्रमाणें त्या द्विजानें शाप दिला ह्मणून मी तुमची सेवा करावयास आलों. असें त्या सर्पाचें बोलणें ऐकून तें त्याणें सकळ मंडुकांस सांगितलें. तेव्हां भेक आपल्या राजासहित बाहेर येऊन अत्यंत हर्षानें मंदविष सर्पावर बसले, मग त्याणें त्यांस नाना प्रकारच्या गति दाखविल्या तेणेंकरून भेक संतुष्ट होऊन बोलले, हत्ती, अश्व, रथ, यांपेक्षां हें, वाहन उत्तम आहे. मग तो दोन तीन दिवस असें चालून मंद जाऊं लागला. त्यासमयीं ते ह्मणाले, आज हळू कां चालतोस? तेव्हां भुजंग उत्तर करितो, मी क्षुधित आहें, याकरितां चालवत नाहीं. तेव्हां मंडूकराजा ह्मणतो, लहान बेडूक खात जा. हें ऐकून सर्प बोलतो मला असाच ब्राह्मणाचा शाप आ-

हृ; त्याप्रमाणें आपण आज्ञा केली. असें भाषण करून प्रत्यहीं भेकांस खाऊं लागला. याप्रमाणें सर्व मंडूक खाऊन शेवटीं त्याणें त्यांच्या राजासही भक्षिलें. असें चिरंजिवीचें वाक्य ऐकून मेघवर्ण ह्मणतो. नीच पुरुष विघ्नाच्या भयानें कार्य आरंभित नाहीं, मध्यम आरंभून विघ्नें झाल्यास टाकितात, आणि उत्तम सहस्रावधि विघ्नें झालीं; तथापि आरंभिलें कार्यसिद्धीस नेतात. अनेक प्रकारचे कष्ट भोगून बुद्धिबळानें त्वां बहुत शत्रु मारिलेस हें योग्यच आहे; कां, शत्रु, अग्नि, ऋण यांचें शेष ठेविलें तर तें पुनः वृद्धिंगत होतें. शस्त्रानें मारिला तर एक मरतो; परंतु बुद्धीनें अनेक एकदांच मरतात. असें राजाचें भाषण श्रवणकरून चिरंजिवी ह्मणतो, सर्व तुझ्या प्रतापानें झालें तुजसारिखे सुशील असतात त्यांस देव सुबुद्धि देतो. देव कोणाचें रक्षण

हातांत काठी घेऊन करीत नाहीं; ज्याचें रक्ष- ण करायाचें असतें त्यास चांगली बुद्धि देतो. आणि इतरांस वाईट बुद्धि देतो. मेघवर्ण ह्म- णाला, तूं बोलतोस तें सर्व सत्य आहे. अ- सा तो मेघवर्ण राजा शत्रूंस मारून वृक्षावर सुखरूप राज्य करिता झाला.


तंत्र तृतीय समाप्त.

॥नक्र ४॥



# तंत्र चतुर्थ.

## लब्धहानि.

### श्लोक.

संकटेसमनुप्राप्ते यस्यबुद्धिर्नहीयते
महारिष्टभयाद्दुर्योगान्मुच्यतेनात्रसंशयः १
यथास्त्रैणेननक्रेण वंचितोपिसवानरः
स्वबुद्धिस्थैर्ययोगेन मुक्तोनक्रभयादसौ २

---

विष्णुशर्मा राजपुत्रांस ह्मणतो, संकटसमयीं ज्याची बुद्धि क्षीण होत नाहीं, तो महा अरिष्टापासून ही वांचतो; जसा वानर नक्रापासून सुटला. तें ऐकोन राजपुत्र पुसतात, हें कसें? मग विष्णुशर्मा सांगतो.

गंगातीरीं एके जंबुवृक्षावर सुमुख वानर रहात असे. एके दिवशीं एक मगर त्या वृक्षाखालीं आला त्यास सुमुख ह्मणतो, तूं माझे घरीं अतिथि आलास ह्मणून मी तुला जांवळें

देतों, असें बोलून त्याणे त्यास जांबळें दिलीं. तीं भक्षून सुसर अत्यंत संतुष्ट होऊन आपल्या घरास गेला. त्या दिवसापासून प्रत्यहीं येऊन अनेक प्रकारचीं भाषणेंकरून दोघे प्रीतीनें असतां एके दिवशीं कांहीं फळें मगरानें आपल्या स्त्रीस नेऊन दिलीं; तीं तिणें भक्षिलीं तीं अमृततुल्य लागलीं. मग ती त्या नक्रास पुसते कीं, प्राणनाथा हीं फळें कोठून आणिलीं-स ? तेव्हां तो ह्मणतो, माझा मित्र सुमुख वानर आहे तो मला नित्य देतो, तीं मी तेथेंच भक्षितों, आज जीं उरलीं तीं तुला आणिलीं, असें त्याचें बोलणें ऐकून ती ह्मणत्ये, अशीं फळें नित्य जो भक्षितो त्याचें काळीज अमृत-तुल्य असेल; तें मला आणून दे, तेणेंकरून जरामरणरहित मी होऊन तुजसहवर्त्तमान बहुत दिवस सुख भोगीन. असें तिचें बोलणें ऐकून मगर ह्मणतो, तो वानर माझा परम

मित्र असतां त्यास तूं विपरीत कां ह्मणतेस ? तेव्हां मगरीनें सांगितलें, जर तुला माझें अगत्य आहे तर त्याचें काळीज दे, नाहीं तर मी प्राण ठेवणार नाहीं. पुनः तो बोलतो, प्रिये, सहोदरापेक्षां मानिला बंधु अधिक आहे; त्याच्याविषयीं तूं दुराग्रह करूं नको. तसमयीं ती बोलली, माझें वचन तूं कधींही अमान्य केलें नाहींस, आज मात्र मनोभंग करितोस, यास्तव मी जीव देईन. असा तिचा निश्चय ऐकून नक्र ह्मणतो, तो वानर मला असाध्य आहे परंतु तुझ्या पुढें उपाय नाहीं असें भाषणकरून सुमुखाजवळ आला. त्यावेळेस सुमुख बोलतो, मित्रा ? आज खिन्न कां दिसतोस ? मग मगर सांगतो, तुझी भावजई मला दुरुत्तर बोलली कीं, दुष्ट कृतघ्ना ! तूं ज्यापासून जीविका करितोस, त्याचें आतिथ्य आपल्या घरीं आणून करीत नाहींस; त्याचेंच घरीं जाऊन प्रति-

दिवशीं उत्तम फळें भक्षितोस. याप्रमाणें तिणें माझी निर्भर्त्सना केली, यास्तव तूं माझ्या गृहीं चाल, तुजसाठीं नानाप्रकारचे पदार्थ घेऊन माझी स्त्री वाट पहात बसली आहे. तेव्हां वानर ह्मणतो, मित्रा! मला उदकांत येववत नाहीं; याकरितां तूंच आपल्या स्त्रीस येथें आण ह्मणजे झालें. तें ऐकून मगर बोलतो, सख्या,मी गंगेच्या कांठीं रहातों तूं माझ्या पाठीवर बसून ये. नंतर तो वानर विश्वासानें मगराच्या पाठीवर बसला. मग सुसर उदकांत उडी टाकून जात असतां त्यास वानर सांगतो, मित्रा! मला भय वाटतें यास्तव हळू चाल. तें ऐकून मगर विचार करितो कीं, वानर माझ्या स्वाधीन झाला, आतां यास आपला अभिप्राय सांगितल्यास चिंता काय? असें मनांत आणून ह्मणतो, तूं आपल्या इष्टदेवतेचें स्मरण कर, कां, स्त्रीच्या आग्रहास्तव तुला मी मारावयास ने

तों. तेव्हां वानर पुसतो, मित्रा, मी काय अपरा-
ध केला ? मग सुसर सांगतो. तूं काल फळें दि-
लींस तीं स्त्रीनें भक्षिलीं, त्यावरून तिला वाट-
लें कीं, अशीं फळें जो नित्य खातो त्याचें का-
ळीज केवळ अमृत असेल. ह्मणून ती मला
ह्मणाली, जर तूं त्याचें काळीज आणून देत ना-
हींस तर मी प्राण ठेवणार नाहीं. त्यासाठीं
तुला नेतों. हें ऐकून सुमुख ह्मणतो, असें जर
मला पूर्वीं कळतें तर वृक्षावर लपवून ठेविलें
जें काळीज तें तुला तेथेंच दिलें असतें. शून्य
हृदय मी असतां मला तूं व्यर्थ आणिलेंस.
सुसर बोलतो, मित्रा ! तर तें दे, ह्मणजे स्त्री सं-
तुष्ट होईल. मग त्याणें वानरास पूर्वस्थळीं
आणिला. नंतर सुमुख वृक्षावर चढून चित्तांत
ह्मणतो, कीं, आज मी काळाच्या हस्तापासून
सुटलों. इतक्यांत सुसर ह्मणतो, सख्या ! लौ-
कर काळीज दे, तें तुझ्या भावजयीला देऊन

यतां हें ऐकून वानर हंसून बोलतो, मूर्खा, दुष्टा! काळीज शरीराबाहेर रहातें कीं काय? असा तूं विश्वासघातकी येथें राहूं नको, सत्वर निघोन जा. असें सुमुख ह्मणाला असतां मगर पश्चात्ताप पावून विचार करितो कीं, मी यास मार्गांत सांगून फसलों, आतां पुनः विश्वास येईसें बोलून यास न्यावा. याप्रमाणें निश्चय करून ह्मणतो, मित्रा तुझी परिक्षा पहावी ह्मणून हें बोललों, आणि तुझी असंभाव्य गोष्ट खरी मानून मी तुला माघारा आणिला, नाहीं तर शरीरावांचून दुसरे ठिकाणीं काळीज नसतें हें बाळकांसही ठाऊक आहे. यास्तव हा विनोद केला असें समजून तूं निर्भय माझ्या घरीं ये, तुजकरितां स्त्री वाट पाहात बसली आहे. तेव्हां सुमुख ह्मणतो, बुभुक्षिताचा विश्वास धरूं नये. ह्मणून प्रियदर्शनास गंगादत्त पुनः भेटला नाहीं. मगर पुसतो, तें कसें? वानर

सांगतो.

एक्या कूपांत गंगादत्त नामा मोठा मंडूक होता, त्याला इतर मंडुकांनीं वहुत त्राशिलें ह्मणून तो रहाटगाडग्याच्या मार्गानें बाहेर येऊन विचार करितो कीं, हे दायाद बलवंत आणि फार आहेत यांस काय करावें ? इतक्यांत एक सर्पाचें बीळ पाहून ह्मणतो, या बिळां- तील सर्पास आपल्या घरीं नेऊन दायादांचा उच्छेद करावा, जसे वाटसरू कांट्यानें कांटा काढितात. असा निश्चय करून बिळाजवळून सर्पास हांका मारूं लागला. तेव्हां भुजंग चि- त्तांत ह्मणतो, हा कोणी मांत्रिक आहे, किंवा मला मारण्याकरितां दुसरा कोणी हांका मा- रितो हें कळत नाहीं; तरी याला येथूनच पुसा- वें. असा निश्चय करून पुसतो तूं कोण आ- हेस ? मंडूक ह्मणतो, मी गंगादत्त नामा मंडूक राजा तुला शरण आलों. तें ऐकून प्रिय

दर्शन सर्प बोलतो, तृण आणि अग्नि यांचा समागम जसा रहात नाहीं तसा मी तुझा परम शत्रू असतां तूं येथें येऊन हें विपरीत भाषण कसें करितोस? तेव्हां गंगादत्त सांगतो, मला वैऱ्यांनीं त्राशिलें ह्मणून तुजपाशीं आलों, तूं आमचा स्वाभाविक शत्रू खरा; परंतु बलवंत शत्रूंस वैऱ्याकरवीं मारवावें असें शास्त्र आहे. याप्रमाणें त्याचें भाषण ऐकून सर्प ह्मणतो, माझें येणें तेथें कसें घडेल. मंडूक बोलला, तुला मी अनायासें नेतों. तें ऐकून प्रियदर्शन चित्तांत ह्मणतो, मी नित्य आहाराची चिंता करीत होतों, तो आज आपल्या आपण जात असतां आळस कां करावा? असा विचार करून त्याच्या समागमें गेला. मग त्याणें स्हाटमार्गानें सर्पास नेऊन आपल्या घरांत ठेविला. नंतर प्रियदर्शनानें सर्व मंडूक खाल्ले, आणि गंगादत्तास ह्मणाला, मित्रा, तुझे

सर्व शत्रु मारिले, यास्तव मला भक्षणार्थ कांहीं दे. तेव्हां गंगादत्त बोलतो, तूं आपल्या मित्राचें कार्य केलेंस आतां आपल्या मार्गानें गृहास जावें. तें ऐकून सर्प उत्तर करितो, गंगादत्ता! त्या बिळांत दुसरा कोणी राहिला असेल. मी जाऊन काय करावें. तर तूंच आपल्या समुदायांतून प्रत्यहीं मला एक मंडूक देत जा, नाहीं तर मी सर्वांस मारीन. याप्रमाणें त्याचें उत्तर ऐकून गंगादत्त भिऊन नित्य एक भक्ष देऊं लागला. तो कोणे दिवशीं सर्पानें प्रतिदिवशींचा बेडूक भक्षून गंगादत्ताचा पुत्रही भक्षिला. तें पाहून गंगादत्ताची स्त्री परम व्याकूळ होऊन ह्मणते तुह्मी या दुष्टास आणून स्वकुळाचा नाश केला; आतां तरी येथून निघा अथवा यास मारावयाचा यत्न करा. असें तिचें वाक्य श्रवण करून विचार करीत असतां सर्प ह्मणतो, मला कांहीं तरी

भक्षावयास दे. तेव्हां गंगादत्त ह्मणतो, मित्रा ! मी असतां तूं भक्षणाची चिंता कां करितोस ? आतां स्त्रियेस पाठवून दुसऱ्या आडांतून आणखी बेडूक आणतों; तोंपर्यंत तूं उगाच राहा. हें ऐकून प्रियदर्शन बोलतो, तूं माझा अन्नदाता पित्यासमान आहेस, लौकर मंडूक आणीव. नंतर स्त्रियेस दुसऱ्या विहिरींत पाठवून ह्मणतो, कांता अजून येत नाहीं याजकरितां मीच जाऊन बहुत भेक घेऊन येतों; तूं येथें स्वस्थ बैस. याप्रमाणें सांगून आपणही रहाट मार्गानें निघून गेला; आणि प्रियदर्शन सर्प मंडुकांची वाट पाहात तथेंच राहिला. त्यानंतर बहुत दिवस गेले असतां विहिरीचें दुसऱ्या कोपऱ्यास एक पाल होती तिची प्रार्थना करून तो सर्प ह्मणतो, हे गोधिके, तुझा व गंगादत्ताचा बहुत स्नेह आहे, तर जेथें तो असेल तेथें जाऊन सांग कीं,

तुला प्रियदर्शन बोलाविता आणि ह्मणतो, तु-
जशीं मी कृत्रिम करीन तर मला शपथ. तूं
कांहीं मनांत संशय आणूं नको. असा त्या-
चा निरोप ऐकून ती पाली गंगादत्ताजवळ ये-
ऊन सर्व वर्तमान सांगती झाली, तव्हां तो ह्म-
णाला, बुभुक्षिताचा विश्वास धरूनये. या-
स्तव तूं जाऊन प्रियदर्शनास सांग कीं, दुष्ट
सर्पा ! आतां गंगादत्त पुनः त्या विहिरींत सर्व-
था येत नाहीं असें समज. मग त्या पालीनें
सर्पास सर्व सांगितलें. ही कथा सांगून वानर
ह्मणतो, तसा मी पुनः तुझ्या घरीं येणार नाहीं.
हें ऐकून मगर बोलतो, तूं न आल्यास मला कृ-
तघ्नता प्राप्त होईल, यास्तव मी उपोषणें करून
तुजप्रित्यर्थ येथेंच प्राण देईन. वानर ह्मण-
तो गाढ गोड गोष्टी सांगून लंबकर्ण रासभा-
स जसा जंबुकानें विश्वास देऊन मारविला,
तसा तूं मला मारावयास इच्छितोस. तें श्रवण

करून मगर पुसतो हें कसें ? मग वानर सांगतो.

एके वनांत कराळकेसरी नामा सिंह रहात असतां त्याच्या शरीरास कांहीं विकार झाला. तेव्हां तो धूसर जंबुकास ह्मणाला. प्रधाना, आज माझ्यानें कोठें जाववत नाहीं, तर तूंच जाऊन कांहीं घेऊन ये. मग जंबुक चहुंकडे फिरत असतां, एक गर्दभ पाहून त्याला ह्मणतो, मामा मी नमस्कार करितों, तुह्मी आतां बहुत रोड दिसतां ! तेव्हां रासभ बोलतो, भाच्या काय सांगूं ? माझा धनी परीट अत्यंत निर्दयी मजवर बहुत ओझें घालून मला पिटीत नेतो, आणि पोटास गवतही घालीत नाहीं; धुळींतली हरळी खाऊन राहातों, मग शरीर पुष्ट कसें होईल ? नंतर जंबुक बोलला, जर असें आहे तर तूं माझ्या बरोबर ये; नदीच्या तीरीं हिरवें चार गवत पुष्कळ असें ठिकाण तुला दाखवितों. तें ऐकून रासभ उ-

त्तर करितो, ती जागा बरी असेल, परंतु तेथें मी एकट्यानें कसें रहावें? तेव्हां धूसर सांगतो मामा, तेथें गर्दभी अभर्तृका बहुत आहेत त्यांणींही मला सांगितलें आहे कीं, आमच्या योग्य भर्ता मिळाल्यास घेऊन यावा. ह्मणून तुला सांगतों. याप्रमाणें त्याचें वाक्य ऐकून लोभास्तव तो गर्दभ त्या धूसराच्या मागें गेला. त्यास पाहून सिंहानें झडप मारिली तों लंबकर्ण पळून गेला मग कोल्हा रागें भरून सिंहास ह्मणाला, आज तुझा पराक्रम मी पाहिला, तुझ्या पुढून गर्दभही निघोन गेला, आतां तूं गजास कसा मारशील? तें ऐकून कराळकेसरी खिन्न झाला, पुनः कोल्हा ह्मणाला आणखी मी एक वेळ त्याला तुजजवळ आणितों, आतां तरी सावध राहून त्यास मारावें. असें सांगून लंबकर्णाचे मागें जाऊन त्यास पुसतो कीं, तूं क्कां पळतोस? तेव्हां तो ह्मणाला, भाच्या!

मजला नेऊन काळाच्या मुखीं दिलें होतेंस, परंतु दैवयोगानें वांचलों. वज्रापरी ज्याचीं नखें तो प्राणी कोण होता? तेव्हां कोल्हा हांसून बोलतो, मामा ती गर्दभी तुला पाहून अत्यंत हर्षयुक्त होऊन तुजकडे येत होती तिला तूं व्यर्थ भिऊन पळालास. आतां तिणें निश्चय केला आहे, जर लंबकर्ण मला न वरील तर मी प्राण त्यागीन. यास्तव सत्वर जाऊन तिला वांचीव, नाहीं तर तुजला स्त्रीहत्या घडून कामदेव शाप देईल; कांकीं, स्त्रीयांची सर्वार्थ साधनीं मुद्रा आहे; तिचा अवमान जो करितो त्यास जटाभस्मधारी करून कामदेव वनांत पाठवील. याप्रमाणें जंबुकाचें बोलणें ऐकून रासभ त्याच्या समागमें जातांच सिंहानें त्यास तात्काळ मारिला; आणि शृगालास रक्षण ठेऊन तो स्नानास गेला. इतक्यांत जंबुकानें त्याचें काळीज व कान भक्षिले; नंतर सिंह

येऊन पाहूं लागला,तों काळीज व कान नाहीं-
त. तेव्हां शृगालास पुसतां कीं, हीं कोणीं भ-
क्षिलीं ? मग तो बोलला, गाढवास काळीज व
कान असत नाहींत. जर असते तर हा पुनः तु-
जपाशीं न येता; तें त्याणें खरें मानून जंबुकास
मांसभाग देऊन तो गर्दभ भक्षिला. अशी
गोष्ट सांगून वानर ह्मणतो, तसा तूं मला मारूं
इच्छितोस तेव्हां मगर ह्मणतो, आपला स्वार्थ
सोडून जो खरें बोलतो तो, युधिष्ठिर कुंभारा-
प्रमाणें दुःख पावतो; तसें मला घडेल. तें ऐकून
वानर पुसतो, हें कसें ? मग सुसर सांगतो.

एका गावांत युधिष्ठिर नामा कुंभार होता तो
भट्टी काढीत असतां ठेंच लागून पडला. तेव्हां
एक खापरी कपाळास लागून शस्त्राप्रमाणें खों-
च पडली. नंतर कांहीं दिवसांनीं त्या देशांत
दुष्काळ झाला, ह्मणून तो कुंभार देशांतरीं जा-
ऊन राजाजवळ चाकरीस राहिला. राजानें

ती जखम पाहून हा शूर आहे असें समजून त्याचा बहुत सत्कार केला. तेव्हांपासून दुसरे शिपाई त्याची ईर्षा करूं लागले; परंतु राजाची कृपा त्याजवर होती याकरितां कांहीं त्यांच्याने बोलवत नसे. एके वेळेस राजानें एकांतीं युधिष्ठिरास पुसलें कीं, हा शस्त्रघात तुला कोणत्या युद्धांत लागला. तेव्हां तो बोलला, राजा! मी आवा भाजीत असतां पडलों, त्या वेळेस खापर लागून ही खोंक पडली. असें त्याचें वाक्य ऐकून राजा लज्जायमान होऊन ह्मणतो, तुझी खोंच पाहून मी फसलों, आतां हें दुसऱ्यास कळलें नाहीं तोंपर्यंत तूं येथून जा, शूरांस कळलें तर ते तुला मारतील, तेव्हां तो बोलला, राजा, माझे पाय बांधून मला रणांत टाक, मग माझें हस्तलाघव पहा. तेसमयीं राजा ह्मणाला, ज्या कुळांत तूं जन्म घेतलास तें कूळ रणांत जाणारें नव्हे; असें असतां तूं त्या

शृगाल पुत्रासारिखी उगीच वल्गना कां क-
रितोस. मग कुंभार पुसतो, त्याणें कोणाजवळ
आपला पराक्रम वर्णिला? तेव्हां राजा सांगतो.

एके वनांत सिंह स्त्रीसहित रहात असतां
त्याला दोन पुत्र झाले. तेव्हां तो नाना प्रकार-
चे मृग मारून आपल्या स्त्रीस देऊन बोलला
कीं, जोंपर्यंत हे मोठे होतील तोंपर्यंत तूं यांस
विसंबूं नको. याप्रमाणें सांगून नित्य पशूंस
आणीत असतां एके दिवशीं सिंहास कांहीं
मिळालें नाहीं. मग तसाच घरीं येत होता, तों
त्यास वाटेंत एक जंबुकाचें पोर सांपडलें. त्या-
ला तसेंच धरून स्त्रीजवळ आणून बोलला कीं,
आज यावांचून दुसरें कांहींच मिळालें नाहीं;
मग तिणें तें अत्यंत लहान पाहून आपले दोन
पोरांबरोबर पाळिलें. पुढें तीं तीन पोरें थोर
झाल्यावर एके दिवशीं अरंण्यांत गेलीं. तेथें
एक हत्ति पाहून शृगालपुत्र, याचे जवळ जाऊं

नये असें बोलून आपण घरास पळून गेला. तें पाहून ते दोघे त्याच्या पाठीमागें घरीं येऊन आपल्या मातेस त्याचें कर्म सांगूं लागले. तें ऐकून जंबुकाचें पोर अत्यंत क्रोधयुक्त होऊन बोलूं लागलें कीं, मी यांपेक्षां शूरत्वास कमी आहें कीं, काय? ह्मणून हे माझी निंदा करून हांसतात, तर मी यांस शिक्षा करून आपला पराक्रम दाखवीन. तें ऐकून त्याला सिंहिणीनें एकीकडे नेऊन सांगितलें, तूं शृगालाचा पुत्र तुझ्या कुळांत गजांचा वध करण्याचें सामर्थ्य नाहीं. तुला मी आपल्या दुग्धानें वाढविला, ह्मणून तूं अशा पराक्रमाच्या गोष्टी बोलतोस; तर आतां जोंपर्यंत यांणीं तुझें स्वरूप ओळखलें नाहीं, तों तूं येथून निघोन आपल्या जातींत जा, नाहीं तर यांच्या हस्तें मरण पावशील. असें ऐकतांच कोल्हा पळून गेला ही कथा सांगून राजा कुंभारास ह्मणतो, तूं कुंभार हें

प्रसिद्ध व्हावयाच्या पूर्वीं लौकर येथून जा. तें ऐकून तो पळाला. याप्रमाणें मगरची गोष्ट ऐकून सुमुख ह्मणतो, स्त्रियांचें कृत्रिम कोणास कळत नाहीं; यास्तव त्यांचा विश्वास मानूं नये. तेव्हां मगर पुसतो कशावरून मग वानर सांगतो.

धारानगरीं सत्यव्रतशर्मा ब्राह्मण सहकुटुंब रहात असतां, त्याची स्त्री सर्वांशीं कलह करूं लागली; ह्मणून तो तिच्या प्रीतीनें स्वदेश सोडून तिजला घेऊन देशांतरीं चालला. मार्गांत स्त्री ह्मणाली, कांता, मला तृषा फार लागली, कोठून तरीं उदक आणून दे. मग तो तिजला ठेऊन पाण्यासाठीं गेला; आणि कांहीं वेळानें पाणी घेऊन येऊन पहातो तों, बायको प्रेत होऊन पडली. मग तो बहुत कष्टी होत असतां आकाशवाणी झाली कीं, तूं आपलें अर्धायुष्य देशील तर पुनः ही उठेल; तें

ऐकून त्या ब्राह्मणानें सुचिर्भूत होऊन आपलें अर्धायुष्य त्रिवार उच्चारून दिलें. तेणेंकरून ती सजीव होऊन जल प्राशन करिती झाली. मग तीं दोघें एका नगरांत जाऊन उतरलीं. तेथें ब्राह्मण साहित्य आणावयाकरितां बाजारांत गेला. इकडे एका पंगूनें सुस्वर गायन आरंभिलें, तें ऐकून ब्राह्मणस्त्री काममोहित होऊन त्या पंगूजवळ जाऊन बोलली कीं, मित्रा, माझा अंगिकार कर नाहीं तर तुला स्त्रीहत्या घडेल. तें ऐकून त्याणे तिचा हस्त धरिला. तेव्हां स्त्री ह्मणाली, हा देह तुला अर्पण केला, आतां तूं निःशंक माझ्या समागमें ये. मग तो पंगू ब्राह्मण उतरला होता त्या ठिकाणीं आला. नंतर ब्राह्मण सामुग्री घेऊन आला. तिणें पाक सिद्ध करून पात्रें वाढिलीं आणि ह्मणाली कीं, या पंगूसही कांहीं अन्न द्यावें, तें श्रवण करून त्या पंगूस अन्न देऊन

उभयतांनी भोजन केलें. मग ती बोलली की का-
रा, तूं मला एकटीला ठेऊन जातोस तेव्हां
करमत नाहीं, याकरितां हा पंगू मला सोबतीस
असूं दे. तें ऐकून ब्राह्मण ह्मणाला, या पांगळ्या-
स कसें न्यावें? तेव्हां मग ती बोलली, मी यास
पाठीशी बांधून नेत जाईन. ब्राह्मण ह्मणाला,
बरें. मग तिनें त्याला पाठीशीं बांधला आणि
ती उभयतां पुढें चालली; तों वाटेंत ब्राह्मण
थकून कुपाचे काठावर निजला. तेव्हां ती स्त्री
भ्रत्यास विहिरींत लोटून आपण त्या पांगळ्या-
ला पटींत घालून एके राजधानीत गेली. तेथें
राजाचे सेवकांनीं ती पेटी पाहून राजानजवळ
नेली. तिच्या बरोबर ही विमली जाऊन
मोठा आक्रोश करूं लागली. तेव्हां पेटी उघ-
डून पाहिली तों, आंत पंगू होता, मग तिला
पुसलें हें काय? तेव्हां ती बोलली, हा माझा
भर्ता [illegible] पीडित ह्मणून मी याला [illegible]

वहान्यें, हें ऐकून राजाने ती भागिनी समान मानून आपल्या जवळ ठेविली. इकडे त्या भार्गीनें वाटसरू उदकार्थ येऊन त्यांणीं त्या ब्राह्मणास काढिला. मग तो पाहूं लागला तों स्त्री व पंगू नाहींत. नंतर फिरत फिरत त्या नगरास गेला; तेथें त्या दुष्ट स्त्रीनें ब्राह्मणास पाहून राजास निवेदिलें कीं, हा माझ्या पतीचा वैरी आहे, तें ऐकून नृपानें सेवकास आज्ञा केली कीं, यास बंदींत ठेवावा तेव्हांचि ते ब्राह्मणास बंधन करूं लागले, तेव्हां तो बोलला, राजा, तूं धर्मज्ञ आहेस याकरितां धर्म न्याय कर, असें बोलून त्याणें आपलें सर्व वर्तमान सांगितलें. तें ऐकून राजाने चौकशी करून पाहिलें तों ब्राह्मण निरपराधी आणि स्त्री दुष्कर्मी असें त्याच्या ध्यानांत येऊन त्याणें त्यास्त्रिस शिक्षा केली, आणि ब्राह्मणाचा सन्मान केला. ही कथा सांगून वानर मकरास बो-

असतो. स्त्रिया अनर्थांचें मूळ आहेत. याम्तव बुद्धिमंतानें यांची गोष्ट एकूं नये. ती एकिली ह्मणून नंदराजा व वररुची प्रधान हेसमस्त उपहास्यता पावले. तेव्हां मगर पुसतो, हें कसें ? मग वानर सांगतो.

नंदन नामा कोणी एक राजा महापराक्रमी होता. त्याची स्त्री एके दिवशीं कांहीं एक भाषणावरून रुष्ट झाली. तेव्हां राजानें बहुत प्रकारें तिला समजाविलें; तें न एकून बोलली कीं, जर तूं तोंडांत लगाम घालून आपल्यापाठीवर मला बसवून अश्वशब्द करशील तर मी तुझी गोष्ट ऐकेन ? तेसमयीं नृपानें तिच्या प्रीतीस्तव सांगितल्याप्रमाणें केलें. तें श्रवण करून प्रधानाच्या स्त्रीनें एके दिवशीं कोपयुक्त होऊन आपल्या भ्रताराशीं बोलली नाहीं. त्यावेळेस वररुचिप्रधान सर्व जाणता त्या कांतेचें समाधान करूं लागला; परंतु ती ह्मणाली

शिर मुंडण करून मला नमस्कार करशील तर मी तुला वश्य होईन. तेसमयीं स्त्रीच्या आग्रहास्तव वररुचिनें मुंडण केलें. नंतर प्रातःकाळीं राजा सभेस बसला तों मंत्री आला. त्यास राजानें पुसलें कीं, तूं मुंडण किमर्थ केलेंस? तेव्हां तो ह्मणाला, राजानें अश्वशब्द उच्चारिला ह्मणून मी मुंडण करविलें. असें उभयतांचें बोललें श्रवण करून लोकांनीं सर्व वर्तमान जाणिलें; ही कथा सांगून वानर बोलतो, स्त्रियांचें अनुचित वचन श्रवण करून पुरुषानें मौन धरावें. तें सोडून जो भाषण करितो तो, व्याघ्रचर्माच्छादित रासभाचे परी क्लेश पावतो. हें कसें ह्मणून मगरानें पुसलें मग वानर सांगतो.

नर्मदातीरीं भवानजी ह्मणोन रजक अत्यंत दुर्बळ रहात होता. त्याचा रासभ दिवसानुदिवस शुष्क होऊं लागला. त्यासाठीं तो

परीट चिंता करीत होता, तों अकस्मात् त्याला व्याघ्रचर्म मिळालें तें हर्षानें रात्री त्या गर्द- भास आच्छादून लोकांच्या शेतांत चरावयास सोडूं लागला. तेव्हां शेतकरी हा व्याघ्र आहे असें वाटून पळत असत. एके दिवशीं तो गर्दभ अत्यंत पुष्ट होऊन शेतांत धान्य खात असतां गर्दभीचा शब्द ऐकून मोठ्यानें ओरडूं लागला, त्यावरून धान्यपतींनी हा व्याघ्र नव्हे असा निश्चय करून त्यास धरून मारिला. याजनव स्त्रियांशीं व्यर्थ बोलूं नये, असें असतां निच्यासाठीं तूं माझा घात करीत होतास हा तुझा अपराध नव्हे. कां, तुझी जातच विश्वा- सघातकी आहे ती साधु समागमानें ही चांग- ली होणार नाहीं, कारण दुष्टांस उपदेश करून फळ नाहीं. याप्रमाणें ते दोघे भाषण करीत असतां एके जळचरानें येऊन मगरास सां- गितलें कीं, तुझी स्त्री वाट पाहून उपोषणानीं

मेली. तें ऐकून मगर फार श्रमी होऊन ह्मणा-
ला, मी दुष्ट ह्मणून अशा संकटांत पडलों, एक
तर मित्राशीं विरुद्ध झालों, दुसरें स्त्रीही मरण
पावली; आतां गृह आणि अरण्य समान
झाले; कां जेथें भार्या नाहीं तें घर स्मशानाप्र-
माणें दिसतें. यास्तव मित्रा, माझा अपराध
क्षमा कर; मी तुजशीं कपट केलें ह्मणून अग्नि
प्रवेश करितों. हें ऐकून वानर हांसून बोलला,
तूं स्त्रीजित असें मी पूर्वींच सुचविलें, तिच्या
वचनानें घातकर्मीं प्रवर्तलास आणि आतां ही
तिच्याच मरणाचा खेद मानून प्राण त्यागूं इच्छि-
तोस; अशी दुष्ट स्त्री मेल्यास संतोष मानावा
याविषयीं एक व्यभिचारिणी स्त्रीची गोष्ट आहे.

चंपावती नगरींत देवदत्तनामा वृद्ध साव-
कार होता. त्याची स्त्री परपुरुषाशीं आसक्त
होती. तिजला एक धूर्त बोलला, हे सुंदरी
माझी भार्या मेली; याकरितां मी बहुत दुःखी

आहे, तर माझें दुःख परिहार कर, तुला पाहून मी फार संतोष पावलों. तें ऐकून ती ह्मणाली जर तुझ्या मनांत असें आहे; तर माझ्या भ्रताराचें धन घेऊन तूं आणि मी देशांतरास जाऊन सुखरूप राहूं. तव्हां तो ह्मणाला, फार उत्तम सांगितलेंस, आतां याचा उद्योग मी लोकर करीन. नंतर दुसरे दिवशीं प्रातःकाळीं बहुत धन घेऊन संकेताप्रमाणें दोघेंही देशांतरास चाललीं. कांहीं कोश गेलीं तों मार्गांत मोठी नदी पाहिली. जार आपल्या मनांत विचार करितो कीं, जर मागून धांवणें आलें तर स्त्री व धन नेऊन माझा प्राण घेतील. यास्तव इला सोडून द्रव्यच न्यावें. असा निश्चय करून स्त्रीस ह्मणतो, ही नदी फार कठीण, व उदक ही पुष्कळ आहे, याकरितां अगोदर पलीकडे सर्व ठेऊन मग तुला घेऊन जाईन. तेव्हां ती बोलली, जसें तुझ्या चि-

त्यास येईल तसें कर. नंतर तो धन घेऊन जाते वेळेस बोलला, प्रिये, तुझें वस्त्रही सोडू-न दे, म्हणजे तुला न्यावयास कठीण पडणार नाहीं. तेसमयीं तिणें वस्त्रही सोडून दिलें. तें घेऊन तो धूर्त वित्तासहित पळून गेला. हें पाहून ती आपल्या चित्तांत खिन्न होऊन के-ल्याकर्माचें फळ हें प्राप्त झालें, असें बोलून लज्जेस्तव पाण्यांत बसली. इतक्यांत एक कोल्ही मांसाचा गोळा घेऊन आली, तों नदीं-तून मत्स्य तीरास आला. त्यास पाहून मां-स भूमीवर ठेवून तो धरावयास ती प्रवर्त्तली त्याकाळीं मत्स्य पाण्यांत गेला. पुनः माघारी गेली तों मांस घारीनें नेलें, तें पाहून ती स्त्री हांसून बोलली, मत्स्य आणि मांस गेलें, आ-तां काय पाहतीस? याप्रमाणें तिचें वाक्य ऐकून शृगाली क्रोधयुक्त होऊन ह्मणाली, ज-सें माझें कर्म तसेंच तुझें. जार व भ्रतार या

दोघांनीं ही तुझा त्याग केला आतां नागर्वा होऊन काय विचार करितोस ? अशी गोष्ट सांगून सुमुख मगरास ह्मणतो त्या दुष्ट स्त्रीचा शोक न करितां मगरा, तूं आपल्या गृहास जा. नंतर मगर घरास गेला तो तेथें दुसरा मगर राहिला होता, त्यास पाहून तो विचार करूं लागला, आपले स्थानही घेतलें, आतां यास साम, भेद, दंड, यांतून कोणता उपाय करावा हें मित्रावांचून दुसरा कोणी सांगणार नाहीं; याकरितां त्यालाच पुसावें. असा निश्चय करून पुनः त्या जंबू वृक्षाजवळ येऊन सुमुखास ह्मणों लागला, मित्रा, माझ्या अभाग्याचे देवानें घरही दुसऱ्यानें घेतलें आतां मी काय करूं ? तेव्हां वानर बोलला कृतघ्ना, तूं दुष्कर्म करून पुनरपी मूर्खपणें मजकडे फिरून आलास ? मूर्खास बोध केला तर आपला नाश होतो. याविषयीं एक गोष्ट सां·

गतों.

एका वृक्षावर चिमण्याचा जोडा रहात असतां मोठी वृष्टि होऊन गारा पडूं लागल्या त्या वेळेस एक वानर थंडीने पीडितहोऊन वृक्षाचे आश्रयास आला, त्याची परम कठीण अवस्था पाहून त्या झाडावरचा चिमणा बोलला, तुला हातपाय असून शीतवातादि दुःख तूं कां भोगितोस? घर कां करीत नाहींस? असें त्याचें वाक्य श्रवण करून तो दुष्ट वानर आपल्या चित्तांत विषाद मानून ह्मणतो सुचीमुखा मूर्खा तूं शहाण्यास शब्द कां लावितोस? मला घर करावयाचें सामर्थ्य नाहीं, परंतु मोडण्याची शक्ति आहे, असें भाषण करून त्याचें कोटें उपटून टाकिता झाला. यास्तव खळांस उपदेश करूंनये. तेव्हां मगर ह्मणाला, मित्रा! मी अपराधी खरा, परंतु तुझा पूर्व स्नेही याकरितां तुला विचारितों. तेसमयीं

वानर ह्मणाला, तूं तेथें जाऊन शत्रूशीं युद्ध कर; मरण पावलास तर स्वर्गास जाशील, जय मिळविलास तर घरांत राहून सुख भोगशील. व्हावयाचें असेल तसें होईल परंतु जसें चतुर शृगालानें उत्तमास नमस्कार शूरास भेद, कार्य कर्त्यास दान, आणि समानाशीं युद्ध केलें असें करावें. तेव्हां मगर पुसतो, हें कसें? मग सुमुख सांगतो.

हिमवान् पर्वतावर चतुर नामा कोल्हा फिरत असतां त्याणें एक मृत गज पाहिला त्याचें चर्म भेदून मांस खाण्याचें सामर्थ्य जंबुकास नव्हतें, ह्मणून तो तेथेंच बसला. इतक्यांत एक सिंह आला त्यास पाहून शृगालानें नमस्कार केला. त्याणें विचारिलें, तूं कोण आहेस? तेव्हां जंबुक ह्मणाला, मी सेवक आपणा करितां हत्ति मारिला तो रक्षीत बसलों आहें सिंह बोलला; हा मी मारिला नाहीं व दुसऱ्या.

नें जो मारून टाकिला अथवा आपणच मेला त्यास मी भक्षीत नाहीं. हा तुला पाहिजे तर घे. असें त्याचें भाषण ऐकून कोल्हा बहुत संतुष्ट होऊन ह्मणतो, स्वामी, हें योग्यच आहे, कां, थोर स्वपराक्रमानेंच मिळवितात. नंतर सिंह दुसऱ्या वनांत गेला, तों एक वाघ आला त्यास शृगाल ह्मणाला, मामा तूं, या काळाच्या मुखांत कां आलास ? हा गज मारून सिंहानें मला सांगितलें, येथे कोणी व्याघ्र येईल तर त्याला न कळतां मला येऊन सांग, ह्मणजे मी त्यास जीवें मारून टाकीन, कां, पूर्वीं मी हत्तीस मारून स्नानास गेलों होतों, तेव्हां एका व्याघ्रानें तो गज उच्छिष्ट केला त्या दिवसापासून मी वाघ पाहतों, परंतु सांपडत नाहीं. याप्रमाणें सिंहाचा निरोप ऐकून व्याघ्र अत्यंत भय पावून भाच्या, मला प्राणदान दे. असें ह्मणोन लागलाच पळून गेला,

मग एक वानर आला त्यास पाहून कोल्हा म-
नांत ह्मणतो, एक दुरात्मा आला त्यास नम-
स्कार करून घालविला, व दुसऱ्याशीं भेद
केला, आतां याचे हातानें या गजाचें विदारण
करवावें. असा निश्चय करून बोलतो, हे वा-
नरा, तूं बहुतां दिवशीं आलास; आणि क्षुधित
असा मला दिसतोस तर हा गज सिंहानें मला
दिला याचें थोडेसें मांस खाऊन सिंह आला
नाहीं तों लौकर जा. तें ऐकून त्याणें हत्ति
विदारिला, आणि थोडकेंसें मांस खाल्लें. तें
पाहून कोल्हा ह्मणतो, वानरा! सिंह समीप आ-
ला, यास्तव तूं लौकर पळून जा, असें ऐक-
तांच वानर पळाला. मग त्याणें विदारिल्या-
ठिकाणीं कोल्हा मांस खाऊं लागला तों, दुस-
रा एक शृगाळ आला, त्याचा युद्धानें पराज-
य करून आपण यथेष्ट मांस भक्षिता झाला.
सुमुख बोलतो, यास्तव तूं त्या मगरास मारून

आपल्या जाग्यावर सुख भोग दुसऱ्या दे-
शांत सर्व सौख्य मिळेल, परंतु आपला मित्र
तेथें कोणी नसल्यास चित्रांगाप्रमाणें अवस्था
होईल. तें ऐकून मगर पुसतो, चित्रांगाची
कशी अवस्था झाली ? तेव्हां वानर सांगतो.

अयोध्या नगरींत चित्रांग नामा श्वान
होता, त्याला दुष्काळामुळें अन्न मिळेनासें झा-
लें, ह्मणून तो कुत्रा देशांतरास एका गृहस्था-
चे घरीं गेला. तेव्हां त्याच्या स्त्रियेनें त्या-
ला अन्न घालून पाळिला. तो श्वान बहुत दि-
वस तेथें राहून एके दिवशीं सहज घराबाहेर
निघाला तों दुसऱ्या श्वानांनीं अनेक ठिकाणीं
दंश करून त्याचें रक्त मांस काढिलें, त्यामुळें
चित्रांग अत्यंत दुःख पावून मग विचार
करूं लागला कीं, दुष्काळ जरी पडला, तरी
स्वदेश सोडून जाऊं नये; असा निश्चय करून
पुनः अयोध्या नगरींत आला. तेसमयीं त्या-

ची सर्व ह्मानी पुसों लागली, चित्रांगा, तो देश कसा आहे? त्यावेळेस तो ह्मणाला, देश चांगला सुभिक्षित, व स्त्रियाही बहुत दयावंत आहेत परंतु स्वजातीशीं मित्रता नव्हती ह्मणून अशी दशा झाली. ही कथा सांगून सुमुख मगरास बोलतो, स्वस्थानाप्रमाणें सुख नाहीं. ह्मणून युद्धकरून तें गेलेलें पुनः मिळीव. याप्रमाणें सुमुखाचें बोलणें ऐकून मगर सुसराशीं युद्ध करून आपलें गृह घेऊन तेथें सुखरूप राहिला.


तंत्र चतुर्थ समाप्त.

# तंत्र पंचम.

## संप्रेक्ष्यकारित्व.

### श्लोक.

लाभायान्यस्यदुष्कर्मदृष्ट्वाश्रुत्वाविचारितं
धीमतातन्नैवकार्यमापदामाकरोहितत् १
यथाहिमणीभद्रस्यकर्मदृष्ट्वाथनापितः
अविचार्याकरोत्तद्बुद्धिपार्त्तिसमुपागतः २

---

विष्णुशर्मा राजपुत्रांस सांगतो, कोणाचें
कर्म पाहून अथवा श्रवण करून बुद्धिमंतानें
करूंनये, असें असतां मंदमति नापितानें
ाभद्राचें कर्म पाहून विचार न करितां तसें
ं त्यास्तव तो विपत्ति पावला. याप्रमाणें
णुशर्म्याचें भाषण ऐकून राजपुत्र पुसतात,
सें १ मग तो सांगतो.

दक्षिण देशीं पैठण नगरांत मणिभद्र नामा
ाकार रहात होता हे

सतांही दरिद्री झाला. त्यामुळें अपमान होऊन ह्मणतो, या दरिद्रास धिक्कार असो. कां, दया, शांति, इत्यादिक धनहीनाचे गुण लोकांस विपरीत वाटतात; आणि प्रतिक्षणीं संताप होऊन कुटुंब पोषणाच्या चिंतेंकरून बुद्धि मंदत्व पावत्ये, व धान्यादि पदार्थांवांचून गृह स्मशानवत् भासतें. तो पुरुष दरिद्री विद्यादिगुण युक्त असूनही लोकांच्या संख्येंत येत नाहीं. असें नाना प्रकारचें दुःख दरिद्रतेमुळें घडतें. तर आतां उपोषण व्रत करून प्राण त्यागावा असा निश्चय करून मणिभद्रानें निद्रा केली. नंतर पद्मनिधि गोसाव्याचें रूप धरून त्याचे स्वप्नांत येऊन बोलला, मी तुझ्या आचरणानें प्रसन्न झालों आणि तुझ्या घरीं उद्यां याचकरूपानें येईन; तेव्हां माझ्या मस्तकावर काठी मार ह्मणजे मी अक्षय सुवर्णनिधि होऊन राहीन. असें ऐकून तो जागा झाला, आणि ह्मणतो; हें

स्वप्न सत्य आहे, किंवा सर्वकाळ मी द्रव्याची चिंता करितों यास्तव हा भास झाला? याप्रमाणें विचार दुसऱ्या दिवशीं करीत बसला; तों अकस्मात रात्रीं पाहिल्याप्रमाणें गोसावी आला. तेव्हां मणिभद्रानें स्वप्न खरें मानून त्याच्या मस्तकावर काठी मारिली तों, तो सुवर्णमय झाला. सावकारानें त्यास घरांत नेऊन ठेविला. हें सर्व वर्तमान तेथें एक न्हावी होता, त्याणें पाहिलें आणि तो आपले घरीं जाऊन आश्चर्ययुक्त होत्साता विचार करूं लागला कीं, आपणही उद्यां प्रातःकाळीं गोसाव्यास बोलावून आणून त्याच्या मस्तकावर काठी मारावी, ह्मणजे तो सुवर्णाचा होईल. असा निश्चय करून दुसरे दिवशीं गोसाव्यांच्या समुदायांत जाऊन फार नम्र होऊन बोलला, आपण सर्वांस ज्ञानोपदेश देऊन तारितां, व सर्वांचे घरीं भिक्षेस जातां, तसेच आज माझ्या घरास समुदा-

यासहित यावें. तेव्हां जो सर्वांत श्रेष्ठ होता तो ह्मणाला नित्य ब्राह्मण तुमच्या येथें येत असतां तूं आह्मास कां बोलावितोस? ब्राह्मणांस बोलाव. तेसमयीं नापित बोलतो, तुमचा धर्म मी जाणतों, यास्तव तुह्मी अगत्य यावें; असें सांगून आदरानें त्या मुख्याचा हात धरूनें आपल्या घरास घेऊन आला आणि त्याचे मस्तकावर मुसळानें प्रहार करिता झाला; तेणेंकरून तो गोसावी मूर्च्छित होऊन पडला. हें पाहून दुसऱ्या गोसाव्यांनीं मोठा गलबला केला. तेसमयीं कोतवालाचे शिपाई येऊन त्याणीं त्या नापितास बांधून न्यायाधीशाकडे नेला. मग न्यायाधिशानें न्हाव्यास विचारिलें, तूं हें काय केलेंस? तेव्हां तो ह्मणाला, जसें माणिभद्राचें घरीं पाहिलें त्याप्रमाणें मी केलें. न्यायाधिशानें सावकारास बोलावून पुसलें, तेव्हां तो कांहीं बोलला नाहीं त्यावरून त्याणें आज्ञा केली, हा

न्हावी कुपरिक्षक आहे, याला सुळावर द्यावा, कां, कुपरिक्षेंकरून एके ब्राह्मणस्त्रीस संताप झाला, तेव्हां मणिभद्र विचारितो, हें कसें? न्यायाधीश सांगतो.

उज्जनी नगरींत • देवशर्मा ब्राह्मण होता. त्याचे स्त्रीस पुत्र नव्हता ह्मणून तिणें एके मुंगुसास पुत्राप्रमाणें पाळिलें. पुढें कांहीं दिवशीं त्या ब्राह्मणीस मुलगा झाला. ती एके दिवशीं पुत्रास निजवून आपल्या पतीला ह्मणाली, मी पाण्यास जातें, तुह्मी पुत्रास पहात असा; कदाचित् मुंगुस घात करील. याप्रमाणें सांगून ती उदक आणावयास गेली. तेसमयीं मुलगा पाळण्यांत निजला असें पाहून ब्राह्मणही कांहीं कार्याकरितां बाहेर गेला. इतक्यांत एक कृष्णसर्प बिळांतून निघून पाळण्याकडे चालला. त्यास पहातांच नकुळानें तत्काळ मारिला. आणि आपला पराक्रम दाखवावा ह्मणून

बाहेर उभा राहिला. तों ब्राह्मणीनें येऊन त्याचें मुख रक्तानें भरलेलें पाहून त्याणें आपला पुत्र मारिला असें जाणून तो जलकुंभ त्याचे मस्तकावर टाकिला तेणेंकरून तो नकुळ मरण पावला, नंतर ती घरांत गेली, तो पुत्र निजला आहे आणि त्याच्या समीप कृष्ण सर्पाचीं खांडळीं पडलीं आहेत; असें पाहून ती मुंगुसाचा शोक करीत बसली, तेव्हां ब्राह्मण येऊन बोलला, पुत्र असून तूं वृथा शोक कां करितेस ? ती ह्मणाली, तूं अति लोभास्तव माझें वचन अमान्य करून बाहेर गेलास त्याचें फळ हें प्राप्त झालें; कां, अति लोभ्याचे मस्तकावर चक्र फिरतें. असें ऐकून ब्राह्मण पुसतो, हें कसें ? मग ती सांगते.

अमरावती नगरींत चौघे ब्राह्मण मित्र होते, ते दरिद्राने पीडा पावून विचार करूं लागले, आतां आपल्यास बहुत दुःख होतें यास्तव जे-

थें धन मिळेल तेथें जावें; कां, धनहीनास वना-
वांचून सुख नाहीं. असा निश्चय करून चौघेही
देशांतरास गेले, तों क्षिप्रानदीचा समीप भैरवा-
नंद योगी महासमर्थ आहे, असें ऐकून त्याच्या
मठांत जाऊन यथाशक्ति पूजा करिते झाले.
तेव्हां त्याणें विचारिलें, तुह्मी कां आला ? तेस-
मयीं ते बोलले, आह्मास दारिद्रानें त्राशिलें,
ह्मणून द्रव्येच्छेनें निघालों; परंतु तें साहस कर्मा-
वांचून प्राप्त होत नाहीं. याकरितां असा एखा-
दा उपाय करावा कीं, ज्यापासून मोठा लाभ
होईल किंवा मृत्यु तरी येईल. असा निश्चय क-
रून येथें आलों, आतां तूं आमची इच्छा पूर्ण क-
र; नाहीं तर आह्मी प्राण देऊं. याप्रमाणें त्यांचा
आग्रह पाहून तो योगी सिद्धिचतुष्टयांतें चिंतून
त्यांस बोलला, तुह्मी हिमालयाच्या मार्गानें जा,
ज्याची वात जेथें पडेल त्याला त्या ठिकाणीं
सिद्धि प्राप्त होईल. असें सांगून त्याणें त्यांच्या

मस्तकावर चार वाती ठेविल्या. नंतर ते त्याची आज्ञा घेऊन हिमवान् पर्वताकडे चालले. कांहींसे गेले तों एकाची वात पडली, तेव्हां त्याणें तेथें खाणून पाहिलें तों तांब्याची खाण लागली. मग तो इतरांस बोलला, मित्रहो, यथेष्ट तांबें घ्या. तें ऐकून तिघे ह्मणाले, मूर्खा, याणें काय होईल ? हें बहुत घेतलें तरी दरिद्र जाणार नाहीं, याकरितां आह्मी पुढें जातो. असें बोलून तें पुढें गेले. मग तो आपल्या शक्तिप्रमाणें तांबें घेऊन माघारा आला. इकडे हे चालत असतां दोन कोशांवर दुसऱ्याची वात पडली. तो तेथें खणून ह्मणाला हें रौप्य घेऊन आपण माघारे जाऊं. तेव्हां ते दोघे बोलले पुढें सुवर्ण खाण असेल, याकरितां आह्मी जातों. असें सांगून ते गेल्या नंतर हाही रुपें घेऊन गेला. हे दोघे जात असतां तिसऱ्याची वात पडली. तेथें त्याणें खाणून सुवर्ण पाहिलें,

तेव्हां तो अत्यंत हर्षयुक्त होऊन बोलला मित्रा, आतां यथेष्ट सुवर्ण घेऊन जाऊं. त्यावेळेस तो ह्मणाला, मूर्खा, पुढें रत्नें असतील, यास्तव मीं जातों. मग तो बोलला मी हें सुवर्ण घेऊन तुझी मार्ग प्रतीक्षा करितों तूं लौकर ये. तें ऐकून तो जात असतां उष्णानें संतप्तहोऊन क्षुधा, तृषा यांच्यायोगानें सिद्धिमार्गातें चुकोन इकडे तिकडे फिरों लागला, तों, एका पुरुषाचे मस्तकावर चक्र फिरत आहे आणि त्याचें सर्वांग रुधिरानें भरलें आहे असें पाहिलें. तेव्हां त्यास पुसलें तूं कोण? व तुझ्या मस्तकावर हें चक्र कां फिरतें? इतकें त्यास पुसतांचतें चक्र याच्या मस्तकावर येऊन बसलें. मग हा ब्राह्मण घाबरा होऊन ह्मणों लागला, हें चक्र माझ्या डोकीवर कां बसलें? तेसमयीं पूर्व चक्रधर बोलतो, इतके दिवस माझा भोग होता. आतां दुसरा कोणी सिद्धवाती घेऊन येईल; आणि तुला विचारील, तेव्हां

हें चक्र त्याच्या मस्तकावर बसेल. असें ऐकून हा विचारितो, तूं येथें किती दिवस आहेस? तो ह्मणाला, मी काळ जाणत नाहीं; परंतु राम राजाचे वेळेस दरिद्रानें पीडित होऊन येथें या चक्रांत सांपडलों. तें ऐकून ब्राह्मण पुसतो, येथें अन्नोदक कोण देतो ? पूर्व चक्रधर सांगतो; क्षुधा, तृषा येथें बाधत नाहींत, केवळ या दुःखाचा अनुभव मात्र भोगावा लागतो; हें कुबेरानें निधि न्यावयास येतील त्यांला भयप्रदर्शनार्थ ठेविलें आहे; ह्मणून या भयानें कोणी येत नाहीं. याप्रमाणें सर्व वृत्तांत तुला सांगितला. आतां माझे शरीरास बहुत वेदना झाली, यास्तव मी जातों, असें सांगून तो गेला, इकडे सुवर्णसिद्धि याची बहुत वाट पाहून हा आला नाहीं ह्मणून शोध करीत चालला. तों याचे डोकीवर चक्र फिरतें, हें पाहून समीप येऊन पुसतो, मित्रा ! हें कांय ? तेव्हां तो ह्मणाला, अतिलोभाचें फळ

हें, नंतर सुवर्णसिद्धि बोलतो, मतिमंदास जर कांहीं विद्या असली, तर ते दुसऱ्याची बुद्धि न ऐकून सिंह जिवंत करणारा सारिखे नाश पावतात. तें ऐकून चक्रधर पुसतो; हें कसें? मग सुवर्ण सिद्धि सांगतो.

तुळजापूर गावांत चार विद्यार्थी विद्याभ्यास करीत होते. त्यांत तिघांस मंत्रविद्या साध्य झाली, तेव्हां ते ह्मणाले, विद्येचें फळ राजाश्रय संपादून बहुत द्रव्य मिळवावें. तेसमयीं त्यांतून एक बोलला, अहो, आह्मांत हा एक विद्याहीन आहे. यास आह्मी मिळविल्याचा विभाग देणार नाहीं याकरितां याणें आतांच आपल्या गृहास जावें. तें ऐकून दुसरा बोलतो, हें विद्वानांस योग्य नव्हे; कां, याणें, व आह्मी एके ठिकाणीं बालत्वापासून क्रीडा केली, आणि हा आमच्यापेक्षां व्यवहारांत जाणता आहे. राजाचे घरीं व्यवहार चातुर्यावांचून केवळ वि-

दोनेंच प्रतिष्ठा मिळत नाहीं, याकरितां यास ही चतुर्थांश द्यावा; तें सर्वांनीं मान्य करून चौघेही देशांतरास चालले. तों अरण्यांत एक सिंह मेलेला पडला होता; त्यास पाहून एक ह्मणाला, आपल्यास विद्या येते तिची परीक्षा पहावी. तें ऐकून व्यवहार चतुर बोलला, या सिंहास सजीव केला तर हा सर्वांस भक्षील, यास्तव याची परीक्षा पाहूंनये. असें त्याणें बहुत प्रकारें सांगितलें, तें न ऐकून त्रिवर्ग आग्रहास्तव सिंहास सजीव करूं लागले. तेसमयीं हा ह्मणाला, या अयोग्य कर्मापासून शाहाण्यानें दूर असावें. असें बोलून आपण लांब जाऊन झाडावर बसला. मग त्याणीं तो सिंह सजीव करितांच त्या सिंहानें तिघांस मारिलें. ही कथा सांगून सुवर्णसिद्धि बोलतो, विद्येहून बुद्धि अधिक आहे. तेव्हां चक्रधर ह्मणाला, असेंच केवळ नव्हे कां, बुद्धिमंत मोठ्या सावधगि-

रीनें घरांत असला तरी नाश पावतो; आणि मूर्खही कदाचित् अरण्यांत एकटा वांचतो. जसें सहस्त्रबुध्दि, व शतबुध्दि, हे दोघे मत्स्य मेले गेले, आणि एकबुध्दि जलांत क्रीडा करून स्वस्थ राहिला, याप्रमाणें त्याचें वाक्य ऐकून सुवर्णसिध्दि पुसतो हें कसें? मग चक्रधर सांगतो.

मगध देशांत पद्मसरोवरामध्यें सहस्त्रबुद्धि आणि शतबुध्दि असे दोन मत्स्य होते त्यांसीं व एकबुध्दि नामा मंडुकाशीं मैत्री होती. एके दिवशीं तेथें कोळी जाऊन बोलले कीं, उदयीक येथील मत्स्य मारूं. ते एकबुद्धीनें ऐकून उभयतांस निवेदिलें. तेसमयीं सहस्त्रबुद्धि ह्मणाला, मी जलगति बहुत जाणतों, शतबुध्दि बोलला आपलें जन्मस्थान सोडूनये, यास्तव जें होणें तें येथेंच होवो. याप्रमाणें त्यांचीं वाक्यें ऐकून मंडूक ह्मणतो, मि-

त्रहो? मी जातों तुह्मी ही चला, तेव्हां ते बोल
ले, तूं एक बुध्दि आहेस यास्तव जाशील तर
जा आह्मी येत नाहीं. नंतर तो बेडूक आप-
ल्या परिवारासहित स्थलांतरास गेला. मग
दुसरे दिवशीं मत्स्य घातकांनी जाळीं टाकून
बहुत मत्स्य धरिले, त्यांत सहस्त्रबुध्दि ए-
कानें डोकीवर घेतला, व शतबुध्दीचें पुच्छ धरू-
न चालला. तें पाहून एकबुध्दि मंडूक आपल्या
स्त्रियेस ह्मणतो, सहस्त्रबुद्धि व शतबुध्दि यांची
अशी अवस्था झाली, आणि मी एकबुध्दि ज-
लांत क्रीडा करितों. अशी कथा सांगून चक्रकर
बोलतो, यास्तव बुध्दि मंतांची ही दैवयोगानें अ-
शी दशा होत्ये असें त्याचें भाषण ऐकून सु-
वर्णसिध्दि बोलतो, लंबकर्णास सुमतीनें निषे-
धिलें असतां तो गायन करून बंध पावला,
तशी तुझी अवस्था झाली तेव्हां चक्रधर पु-
सतो, हें कसें? मग सुवर्णसिध्दि सांगतो.

लंबकर्ण नामा एक गाढव व सुमती नामा एक कोल्हा, हे दोघे प्रतिदिवशीं लोकांचीं शेतें भक्षून रानांत रहात होते. एके दिवशीं यथेष्ट भक्षण करून उभयतां बसले असतां, लंबकर्ण ह्मणतो, चांदणी रात्रींत मला करमत नाहीं, यास्तव मी गायन करितों, तेव्हां सुमती ह्मणाला, लंबकर्णा ? तूं गायन करूं नको, कां तुझें गायन ऐकून शेतकरी जागे होऊन तुला ताडण करितील, ह्मणून तूं मौन धर. तेसमयीं तो बोलला, तुला याविषयीं ज्ञान नाहीं याकरितां तूं मला निषेध करितोस. अशी त्याची निंदा करून तो रासभ गायन करूं लागला, त्याणें शेतकरी जागे होऊन त्या लंबकर्णास धरून ताडण करिते झाले. तें पाहून शृगाल बोलला मामा, मी सांगितलें तें न ऐकून तूं गायन केलेंस, त्याचें फळ हें प्राप्त झालें. तेव्हां चक्रधर ह्मणतो, हितवाक्य ऐकूनही मंथर कोष्टी

मरण पावला, मग सुवर्णसिद्धि पुसतो, हें कसें ? त्यासमयीं चक्रधर सांगतो.

नारायण गावांत मंथरनामा कोष्टी नाना प्रकारचीं वस्त्रें विणून स्त्रीसहित रहात असतां त्याचा माग मोडला, ह्मणून तो रानांत लांकडांकरितां जाऊन मोठा एक सिसवीचा वृक्ष तोडूं लागला; त्याजवर यक्ष रहात होता, तो बोलला, ह्या माझ्या ठिकाणीं तूं उपद्रव करूंनको. तुला जें पाहिजे तें मी देतों. तेव्हां कोष्टी बोलतो, मी आपल्या घरास जाऊन सर्वांस विचारितों, ते सांगतील तें मागेन. याप्रमाणें सांगून तो घरीं येत असतां वाटेंत त्याचा मित्र नापित भेटला. तेव्हां त्यास पुसलें, तो ह्मणाला, तूं राज्य माग, ह्मणजे तूं राजा, व मी मंत्री होईन. तें ऐकून आपल्या स्त्रीस सर्व वर्तमान सांगितलें, ती बोलली, राज्यास अनेक विघ्नें असतात, यास्तव तें नको, परंतु दुस-

रें एक मुख व दोन हात इतकें माग ह्मणजे नित्य दोन वस्त्रें तयार केलींस तर संसार चांगला होईल. तें मान्य करून पुनः तो त्या वृक्षाजवळ जाऊन यक्षाला ह्मणाला, मला दुसरे दोन हात, व एक शिर दे. तें ऐकून तो तथास्तु असें बोलतांच मागीतल्याप्रमाणें झालें. मग तो कोष्टी घरीं येत असतां लोकांनीं विपरीत पाहून हा राक्षस असेल ह्मणून त्याला दगडांनीं मारिला. यास्तव जें होणार तें चुकत नाहीं. असें जाणून चतुरानें व्यर्थ लोभाची कल्पना करूनये ती करून चंद्रशर्म्याची हानि झाली. तेसमयीं सुवर्णसिद्धि पुसतो, हें कसें? मग चक्रधर सांगतो.

पंढरपुरांत कृपणशर्मा एक ब्राह्मण भिक्षा मागून उदरपूर्ति करीत असे आणि जें धान्य राहील तें घागरींत भरून ती घागर शिक्याव-र ठेऊन आपण त्याखालीं निजत असे. एके

दिवशीं तो चित्तांत विचार करितो कीं, दुष्का-
ळ पडला ह्मणजे हें धान्य विकून शेळ्या घेईन,
त्यांचा विस्तार झाल्यावर तो देऊन गाई घेऊन
त्यांची संतती बहुत वाढल्यावर ती बदलून घो-
ड्या घेईन, त्यांस पुष्कळ शिंगरें होतील, त्यां-
चा विक्रय करून मी बहुत द्रव्यवान् होईन.
मग एका ब्राह्मणाची कन्या पाहून लग्न करीन.
तिचे पोटीं पुत्र होईल तो रांगत असतां मी स्त्रि-
येस सांगेन तूं पुत्रास घे; ती कार्यामुळें घेणार
नाहीं; तेव्हां मी तिला अशी लात मारीन. याप्र-
माणें कल्पना मनांत आणून त्याणें लात मारि-
ली ती घागरीस लागून घागर फुटतांच सर्व
धान्याचाही नाश झाला. यास्तव व्यर्थ कल्पना
करूंनये. तसमयीं सुवर्णसिद्धि ह्मणतो, तुझा का-
य दोष आहे? हा लोभाचा महिमा; लोभानें चं-
द्रसेन राजाचा बहुत नाश केला. तें ऐकून चक्र-
धर पुसतो, हें कसें? मग सुवर्णसिद्धि सांगतो.

अयोध्या नगरींत चंद्रसेन राजाचे पुत्रास वानराशीं खेळण्याचा बहुत छंद असे. ह्मणून त्याणें वानर पागेंत पाळून ठेविले होते, तेथें स्वयंपाक्याशीं व एडक्याशीं दावा पडला. तो पाहून एक चतुर वानर बोलला, येथें कलह उत्पन्न झाला, यास्तव हें स्थान सोडून अरण्यांत जावें. तें ऐकून संपूर्ण वानर ह्मणाले तूं वृद्ध झालास ह्मणोन तुझी बुद्धि जाऊन तूं नाना प्रकारचे कुतर्क करूं लागलास; येथें राजाचे आश्रयानें अनेक प्रकारचें भक्षण मिळतें, तें टाकून वनांत पाला खाणें हें चांगलें नव्हे. जें होणें तें येथेंच होऊ. असें त्यांचें वाक्य ऐकून तो वानर आपणच कुटुंबासुद्धां दुसऱ्या ठिकाणीं जाता झाला. नंतर एके दिवशीं मेंढ्यानें स्वयंपाक्यास थडक मारिली, ह्मणून त्याणें जळत काष्ट घेऊन त्यास मारिलें; तेणेंकरून त्याची लंव जळों लागली. तसाच तो पागेंतील गवताचे

गंजींत शिरला, तेणेंकरून सर्व अश्वशाळा पेट-
ली; त्यांत कित्येक अश्व जळून मेले; कांहीं अर्धद
ग्धहोऊन पडले; कितिकांचीं नेत्रादिक अंगें ज-
ळालीं; हें वर्तमान राजास कळतांच राजानें अ-
श्ववैद्यांस बोलाऊन पुसलें कीं, अश्वांचा दाह-
शमनार्थ काय उपाय करावा? तेव्हां त्याणीं
सांगितलें, वानरांचे तेलानें घोडे बरे होतील. तें
ऐकून राजानें सेवकांस आज्ञा केली कीं हे सं-
पूर्ण वानर मारून अश्व बरे करावे. नंतर त्याणीं
राजाज्ञे प्रमाणें केलें हें त्यावृद्ध वानरास कळून
तो परम कष्टी होऊन याचा सूड घेईन असें म-
नांत आणून, अरण्यांत फिरत असतां, मोठें स-
रोवर अत्यंत रमणीय, मार्गावर पाहून विचार
करितो कीं, ह्या तळ्यावर मनुष्यसंचार नाहीं,
तस्मात् येथें कोणी राक्षस असेल. असें जा-
णून दुरूनच एक कमळणीचा देंठ घेऊन त्या-
णें उदक पान केलें. हें राक्षसानें पाहून तो तळ्यां

तून वानराच्या समीप येऊन ह्मणतो; तुझें चातु-
र्य पाहून मी प्रसन्न झालों, ही माझी रत्नमाला
तूं घे असें ह्मणोन आपल्या गळ्यांतली माळ
त्यास दिली, तेव्हां वानर पुसतो, तुझी शक्ति
पाण्यांत किती आहे? तेसमयीं राक्षस सांग-
तो, सहस्रावधी माणसें उदकांत एकदांच आ-
लीं तरीं मी तीं बाहेर निघूं देणार नाहीं. याप्रमा-
णें त्याचें भाषण ऐकून, वानर ह्मणतो, तुला मी
पुष्कळ भक्ष्य आणितों, असें सांगून ती रत्न-
माला गळ्यांत घालून चंद्रसेनराजाचे नगरा-
स येऊन राजास भेटला; आणि ह्मणतो, तुझें
अन्न बहुत दिवस भक्षिलें त्यासाठीं तुझ्या भे-
टीस आलों. तेसमयीं चंद्रसेनानें विचारिलें
ही रत्नमाला कोठून आणिलीस? तेव्हां वानर
बोलतो, अरण्यांत तळें आहे त्यांत जो सूर्यो-
दयापूर्वीं उडी घालतो त्यास अशीं रत्नें मि-
ळतात. तें श्रवण करून राजा ह्मणतो, मी ये-

तां. तेव्हां वानर बोलला, बहुत उत्तम आहे; नंतर राजा सैन्यासुद्धां वानराबरोबर जाऊन सरोवराच्या समीप उतरला. मग रात्र गेल्या-नंतर वानर पहांटेस उठून राजास ह्मणतो रत्ना-ची इच्छा असली तर समय हाच आहे. तें ऐ-कून चंद्रसेन सैन्यासुद्धां तळ्यांत जाऊं लाग-ला, तेसमयीं वानर ह्मणतो,सर्वांस आंत जाऊंदे. हे रत्नें घेऊन आल्यावर मी आणि तूं उभयतां जाऊन उत्तम रत्नें घेऊन येऊं. याप्रमाणें ऐ-कून राजानें सर्वांस आज्ञा केली कीं, उत्तम रत्नें घेऊन यावें. अशी राजाज्ञा होतांच संपू-र्ण तळ्यांत शिरले, ते राक्षसाने बुडवून मारि-ले. सेवकांस बहुत वेळ झाला, ह्मणून राजा वानरास पुसतो कीं, अद्यापि कोणी कां येत-नाहीं? तेसमयीं वानर मोठ्या वृक्षावर चढून राजास ह्मणतो, माझें संपूर्ण कुळ मारविलेंस त्याचें उसनें मी घेतलें. तूं अन्नदाता ह्मणून

तुला वांचविला. असें बोलणें ऐकून राजा प- श्चात्ताप पावून बोलला, फार लोभानें जें करा- वें तें दुखःदेतें. असें ह्मणोन घरास गेला. अ- शी कथा सांगून सुवर्णसिद्धि बोलतो तसेंच तूं कर्म करून अशी अवस्था भोगितोस. बरें आ- तां मी जातों, तेव्हां चक्रधर पुसतो, संकटका- ळीं मित्र उपयोगी पडतो, असें असतां तूं मला सोडून कसा जातोस?, तेसमयीं सुवर्णसिद्धि बोलतो, चोरानें राक्षस धरिला होता ती गोष्ट बोलल्यापुळें वानर नाशपावला. त्यास्तव मी या चक्रास भितों. तें ऐकून चक्रधर पुसतो, हें कसें? मग सुवर्णसिद्धि सांगतो.

मथुरा नगरींत भद्रसेन राजाची कन्या र- त्नावती परम सुंदर होती, तिला नेण्याकरितां एक राक्षस टपत होता, परंतु उपाय चालेना, ह्मणून लपून बसला. हें पाहून ती कन्या बोल- ली, सखे, हा राक्षस मला रात्रदिवस दुःख दे-

तो याचा उपाय करावा. तें ऐकून राक्षस विचार करितो, मी इच्या हरणार्थ आलों असा दुसरा मजपेक्षां बळिष्ट आला असला तर काय करावें? याप्रमाणें भय मानून तो राजाचे पागेंत घोडा होऊन बसला. तेथें रात्रीचेठायीं चोर अश्व न्यावयाकरितां आला. त्याणें अश्वांत हा चांगला पाहून याचे तोंडांत लगाम देऊन बाहेर काढिला. नंतर वर बसून घरीं नेत असतां तो इकडे तिकडे धावूं लागेला. तेसमयीं चोरानें चाबुक मारून पाहिलें; परंतु हा सुधा चालेना, त्यास्तव चोर मनांत विचार करितो, मी बहुत घोडे पाहिले त्यापेक्षां हा विपरीत दिसतो; तस्मात् येथें कांहीं कृत्रिम आहे. असें समजून वडाखालीं घोडा गेला; तेव्हां पारंबी धरून वडावर चढला. मग राक्षस माराच्या भयास्तव पळूं लागला. हें पाहून त्या वडावर वानर होता तो बोलला, अरे, हा मनुष्य आहे तूं राक्ष-

स असून कां पळतोस. असें ऐकतांच चोरानें वानरास धरून आपटिलें, तें पाहून राक्षस पळाला. सुवर्णसिद्धि ह्मणतो, तसें मला या चक्राचें भय वाटतें. तेव्हां चक्रधर ह्मणाला दैव प्रतिकूल झालें तर अशीं दुःखें प्राप्त होतात. पहा लंकेस त्रिकूटाचलासारिखा पर्वत आणि समुद्रासारिखा खंदक, स्वयें राक्षस प्रतापी, शुक्र गुरु, असे असतां रावणाचा पराभव वानरांहातें झाला. तस्मात् दैवापुढें कोणाचा उपाय नाहीं, तें अनकूळ झालें तर विपरीताचें सुपरीत होतें. जसें अंध, कुब्ज, त्रिस्तनीकन्या यांस झालें. तें ऐकून सुवर्णसिद्धि पुसतो, हें कसें? मग चक्रधर सांगतो.

मधुपुर नगरांत मधुसूदन राजा होता, त्याला त्रिस्तनी कन्या झाली. तेसमयीं ज्योतिषी ब्राह्मणांस राजानें विचारिलें, इला काय करावें? मग तो बोलतो, महाराज जें सां·

गणें तें विचार करून सांगावें. अविचारें सांगितलें तर चंडकर्म्यासारिखें होईल. तें ऐकून राजा पुसतो त्याणें काय सांगितलें ? नंतर ब्राह्मण सांगतो.

दंडकारण्यांत चंडकर्मा राक्षस फिरत असतां त्याणें एक ब्राह्मण पाहिला. त्याच्या खांद्यावर बसून तो चालला. तेव्हां त्याचीं पाउलें अत्यंत मृदु पाहून ब्राह्मण पुसतो, हे राक्षसा,। तुझीं पाउलें मऊ कशीं झालीं ? मग तो बोलतो, मी स्नान करून ओले पाय आहेत तोंपर्यंत भूमीवर चालत नाहीं. तें ऐकून तो पुढें जात असतां राक्षस तळ्यावर स्नानास उतरून ब्राह्मणास ह्मणतो, मी नित्य कर्म करितों तोंपर्यंत तूं कोठे जाऊं नको. नंतर तो स्नान केला, असें पाहून ब्राह्मण विचार करितो हा आल्यावर मला भक्षील. यास्तव पळावयाचा समय हाच आहे; कां स्नान केल्यावर ओ-

लीं पाउलें असतां तो चालणार नाहीं. असा त्याचा नेम आहे. ह्मणोन तो ब्राह्मण पळाला, तेव्हां राक्षस बोलतो, मी सांगून फसलों, आतां याचे पाठीमागें जावें तर व्रतभंग होतो, ह्मणू-न तो खिन्न होऊन तेथेंच राहिला. ही कथा सांगून ज्योतिषी राजास बोलतो, विचार के-ल्यावांचून कोणतेंही कर्म करूंनये, हा शिष्टा-चार आहे. यास्तव इचें अवलोकन न करावें; कां, विरूप संतान झालें तर तें पाहूंनये असें शास्त्र आहे. तें ऐकून राजानें कन्या स्थलांतरीं ठेविली. पुढें ती उपवर झाली तेसमयीं दे-शोदेशीं सांगून पाठविलें, जो ही कन्या वरील त्याला बहुत द्रव्य देईन. तें ऐकून आंधळा व कुबडा दोघे भिक्षा मागून पोट भरीत होते ते राजद्वारीं गेले. राजास आंधळा ह्मणतो, तुह्मी कन्या मला देशील तर मी वरीन. तेव्हां राजानें विचार केला कीं, यास कन्या द्यावी

हें उत्तम आहे. नंतर तिचा विवाह करून आंधळ्यास बहुत द्रव्य देऊन, सांगितलें, तूं आतां देशांतरास जा. मग ते त्रिवर्ग दुसऱ्या देशांत जाऊन राहिले. तेथें ती कन्या त्या कुबड्यास वश होऊन ह्मणाली, या अंधास विष घालून मारावा, ह्मणजे आपल्यास सुख होईल. तें ऐकून त्याणें मृतसर्प राजकन्येस दिला. मग त्याचीं खंडेंकरून चुलीवर शिजत ठेवून ती अंधास ह्मणाली, हें मांस तुजसाठीं आणिलें आहे त्याजखालीं तूं जाळ लावित बैस, मी कांहीं कार्यास जातें. नंतर तो मंदअग्नीनें पचवीत असतां त्या कृष्णसर्पाची वाफ डोळ्यांस लागून त्या विषानें नेत्रांचा रोग गेला; आणि चांगलें दिसूं लागलें, तों हीं उभयतां हास्यविनोद करीत होतीं; तें पाहून पूर्ववत् चांचपत येऊन कुबड्यास धरून क्रोधानें तिच्या ह्रदयावर आपटला. भेणेंकरून

तिचा तिसरा स्तन जिरला; व कुबडाही सरळ झाला. [illegible]स्तव सांगतो देव अनुकूळ झालें तर सर्व चांगलें होतें. तेव्हां चक्रधर ह्मणतो, अरे तूं आपल्या घरास जातोस तर कोणी तरी सोबतीनें; कां शास्त्रांत सांगितलें आहे कीं, एकानें गांवास जाऊंनये; आणि सर्व निजले असतां जागूं नये, तसेंच उत्तम पदार्थ व सुख मलाच असावें ही इच्छा धरूंनये. या प्रमाणें यथाशास्त्र जो [illegible]चरण करितो तो सर्पापासून जसा ब्राह्मण वांचला असा वांचतो. ते समयीं सुवर्णसिद्धि पुसतो हें कसें ? मग चक्रधर सांगतो.

नाशिक क्षेत्रांत देवदत्तनामा ब्राह्मण राहात होता, तो आपल्या मातेस ह्मणाला, मी गुरूच्या कार्याकरितां गांवास जातों, तेव्हां ती बोलली पुत्रा, एकटा जाऊंनको. तें ऐकून त्याणें उत्तर केलें कीं, मार्ग निरुपद्रव आहे. पुनः ती बोलली,

तूं ह्मणतोस हें खरें; परंतु सोबतीवांचून जाऊं नये यास्तव एक खेंकडा विहिरींतला आणून भांड्यांत ठेऊन पुत्राला दिला; आणि ह्मणाली याला तरीं सोबतीस घेऊन जा. ती मातेची आज्ञा मानून तो त्यास घेऊन मार्गी चालत असतां, उष्णानें शिणून वृक्षछायेंत निजला; तों अकस्मात् कृष्णसर्प त्यास दंश करायास आला. तो भांड्यांत काय आहे ह्मणून पाहूं लागला तों खेंकड्याने हा काळसर्प असें जाणून तो मारिला. मग ब्राह्मण जागा होऊन त्या सर्पास पाहून विचार करतो कीं, हा कसा मेला? नंतर खेंकड्यानें सर्पाचें तोंड तोडिलें होतें तें पाहून ह्मणतो, येवढें कार्य याणेंच केलें. मातेनें बरोबर हा दिला ह्मणून मी वांचलों. असें जाणून तो त्या खेंकड्यास घेऊन घरीं आला, आणि मातेस साष्टांग नमस्कार करून झालावृत्तांत सांगून सुखरूप राहिला. तेव्हां सुवर्णसिद्धि बो·

लतो, हें योग्यच आहे; कां, मंत्र, तीर्थ, ब्राह्म- ण, ज्योतिषी, वैद्य, गुरु, यांचेठायीं जो जशी भावना धरील, त्याला तशीच सिध्धि प्राप्त होईल. अशा भाषणानें चक्रधराचें समाधान करून सुवर्णसिद्धि आपल्या घरास गेला. अशी चक्रधराची गोष्ट सांगून ब्राह्मणी आपल्या पतीस ह्मणाली; तर तुह्मी अतिलोभ केल्यामुळें माझे हातून असें कर्म घडलें. अशी ब्राह्मणस्त्रीची गोष्ट न्यायाधीशानें मणिभद्र सावकारास सांगून न्हाव्यास सर्व लोकांसमक्ष सुळीं दिला.

अशीं पांच तंत्रे विष्णुशर्म्यानें सांगितलीं तीं श्रवण करून राजपुत्र राजनीतीमध्यें निपुणता पावोन सुखेंकरून आपले बापाचें राज्य करिते झाले.

## पंचम तंत्र समाप्त.

